पाकिस्तानने काश्मीरचा प्रश्न सुरक्षितता मंडळासमोर पुन्हा उपस्थित केला त्या वेळी ५ व १० फेब्रुवारी १९६४ रोजी भारताचे प्रतिनिधी केंद्रीय शिक्षण मंत्री श्री० महंमदअली करीम चागला यांनी जी दोन भाषणे सुरक्षितता मंडळाच्या बैठकीत केली ती या पुस्तिकेत दिली आहेत. (ही भाषणे सुरक्षितता मंडळाच्या दुरुस्त न केलेल्या कागदपत्रातून घेतली आहेत.) काश्मीरच्या प्रश्नाबाबत भारताची भूमिका, कायद्याच्या व नीतीच्या दृष्टीने किती बरोबर आहे, हे श्री० चागला यांनी आपल्या बिनतोड व निरुत्तर करणाऱ्या युक्तिवादाने सिध्द केले आहे.

## ५ फेब्रुवारी, १९६४ रोजी, श्री० चागला यांनी सुरक्षितता मंडळात केलेले भाषण

### पाकिस्तानचा अर्ज : द्वेष-मोहिमेचा कळस

सुरक्षितता मंडळ, हे बहुधा संयुक्त राष्ट्र संघटनेचे सर्वांत महत्त्वाचे अंग आहे. संघटनेच्या प्रत्येक सभासद देशाला मंडळाकडे दाद मागण्याचा हक्क आहे. परन्तु त्याने पुरेशा जबाबदारीच्या भावनेने, मंडळाकडे दाद मागितली पाहिजे. कोणत्याही सभासद देशाविरुध्द प्रचार करण्याचे ते स्थान नाही. तसेच, जगात आधीच पुष्कळ प्रश्न आणि अडचणी आहेत. तेव्हा त्यात भर घालून तेढ निर्माण करण्यासाठी काही हे मंडळ नाही, ही गोष्ट उघड आहे. पाकिस्तानने या मंडळाचा बहुमोल वेळ घेण्याचे अजिबात समर्थन करता येणार नाही, याबद्दल तुमची खात्री पटवून द्यायचा माझा विचार आहे. पाकिस्तानने केलेला अर्ज, हा, भारताविषयी त्याने सतत जी द्वेषाची मोहीम चालवली आहे, तिचा जणू काही कळसच आहे. प्रत्येक बाबतीत भारताला विरोध करायचा, हे त्याच्या आंतरराष्ट्रीय धोरणाचे मूलभूत तत्त्व असून, लंडनच्या 'टाइम्स' ने अलिकडेच व्यक्त केलेल्या मताप्रमाणे, "भारताविषयीचे वैमनस्य हे पाकिस्तानच्या परराष्ट्रीय धोरणाचे आधारभूत तत्त्व आहे." सुरक्षितता मंडळाकडे पाहण्याचा त्याचा दृष्टिकोन, हा केवळ आदोलनात्मक दृष्टिकोण आहे. माझ्या देशाविरुध्द व सरकारविरुध्द सुरू केलेली ही मोहीम चालू ठेवण्यासाठी, सुरक्षितता मंडळाचा उपयोग करण्याची त्याची इच्छा आहे.

ही बैठक बोलावण्याचे काही तरी कारण आपल्याला सापडेल, यासाठी व

या बैठकीतील चर्चेतून काय निष्पन्न होण्याचा संभव आहे, हे पाहण्याखाठा, आपण पाकिस्तानच्या परराष्ट्र मंत्र्याचे निवेदन शांतपणे ऐकत होतो. पाकिस्तानच्या प्रतिनिधीचे निवेदन ऐकल्यानंतर सुध्दा, सुरक्षितता मंडळाची बैठक बोलावण्याचे काहीही कारण नव्हते, हे माझ्या प्रतिनिधी मंडळाचे व माझ्या सरकारचे मत कायम आहे, हे मला सांगावेसे वाटते. कारण, जम्मू आणि काश्मीरमधील आजची स्थिती बिघडावी अशी कोणतीही नवी परिस्थिती निर्माण झालेली नाही.

पाकिस्तानच्या अर्जातील मजकूर एखाद्या भयानक कहाणीसारखा वाटतो. काश्मीरच्या 'तथाकथित विलीनीकरणाच्या किंवा भारताला जोडण्याच्या' भारताच्या प्रयत्नामुळे, काश्मीरमध्ये बहुसंख्येने असलेल्या मुसलमान लोकांना फार मोठा धोका निर्माण झाला आहे; मुसलमानांचे प्रचंड जमाव, भारताविरुध्द व सार्वमत घेण्याच्या मागणीला पाठिंबा देण्यासाठी निदर्शन करीत आहेत; काश्मीरमध्ये 'उघड उघड बंड' पुकारण्यात आले आहे; काश्मीरी लोक भारताच्या टाचेखाली चिरडले जात आहेत, व ताबडतोब काही तरी उपाय योजला नाही तर भयंकर घटना घडतील असे आपल्याला सांगण्यात आले आहे. हे सर्व कल्पनेचे खेळ आहेत, त्यात काही तथ्य नाही, अशी मी तुमची खात्री पटवून देईन.

भारतातील मुसलमानांविषयी आपल्याला पुष्कळ कळवळा वाटतो, अशी बतावणी पाकिस्तानने केली असून, त्याच्या परराष्ट्रमंत्र्याने म्हटले आहे की लाखो भारतीय मुसलमानांची पूर्व पाकिस्तानात हकालपट्टी करण्यात आली आहे. पाकिस्तान जेव्हा मुसलमान अल्पसंख्यकाविषयी बोलतो, तेव्हा एखाद्याचा असा ग्रह होतो की एका मोठ्या देशातील दूरवरच्या कोपऱ्यात असलेल्या व हिंदूंच्या प्रचंड लोकसंख्येने वेढलेल्या काही हजार किंवा काही लाख लोकांचा आपण विचार करीत आहोत.

मला मंडळाला हे सांगावेसे वाटते की अल्पसंख्य लोक या शब्दांचा जो सर्वसाधारण अर्थ आहे, त्या अर्थाने मुसलमान, भारतात अल्पसंख्य नाहीत.

त्यांची संख्या पाच कोटी आहे. मुसलमानांच्या संख्येच्या बाबतीत जगात भारताचा तिसरा क्रमांक लागतो. पहिला क्रमांक इंडोनेशियाचा असून दुसरा पाकिस्तानचा आहे. भारतातील मुसलमान, भारताचे पुत्र आहेत. ते वंशाने भारतीय असून नागरिकत्वाचे सर्व हक्क त्यांना आहेत. कोणतेही अधिकारपद त्यांच्यासाठी मोकळे आहे. वस्तुत: त्यांच्यातील बरेच जण अत्यंत उच्च अधिकारपदावर काम करीत आहेत. आमची संस्कृती अनेक विभिन्न संस्कृतीच्या समन्वयाने निर्माण झाली असून मुसलमानांनी तिला लावलेला हातभार अत्यन्त महत्त्वपूर्ण आहे. आमचे राष्ट्र धर्मनिरपेक्ष राज्य असून, प्रत्येकाला समान हक्क, समानसंधी व कायद्याचे समान संरक्षण मिळत आहे. आमचा कोणताही सरकारी धर्म नाही. हिंदू, मुसलमान ख्रिश्चन, बौध्द, शीख, पारशी याना व इतर सर्वांना पूजाअर्चा करण्याच्या बाबतीत व आपापल्या धर्माचे पालन करण्याचे पूर्ण स्वातंत्र्य असून, घटनेनुसार, प्रत्येक नागरिकाला, मूलभूत हक्क देण्यात आले आहेत. आमच्या देशात पहिल्या वर्गाचे नागरिक, दुसऱ्या वर्गाचे नागरिक असा भेदभाव नाही. कायद्यासमोर सर्व सारखे आहेत.

आमच्या व पाकिस्तानच्या धोरणातील हा मूलभूत फरक असून, पाकिस्तान बरोबरच्या आमच्या बऱ्याच मतभेदांचे हे कारण आहे. आमचे राष्ट्र धर्मनिरपेक्षतेवर अधिष्ठित आहे. याचा अर्थ असा की प्रत्येक व्यक्तीला त्याच्या श्रध्देनुसार धर्माचरण करण्याचा पूर्ण हक्क आहे. त्यात सरकारकडून कोणतीही आडकाठी आणली जाणार नाही. याच्या उलट पाकिस्तान हे धर्माधिष्ठित राज्य आहे. मुस्लिम लीगच्या पुढाऱ्यांनी देशाची फाळणी करण्याची मागणी केली ती द्विराष्ट्रवादावर आधारलेली होती. त्यांचा असा दावा होता की हिंदू व मुसलमान यांचे राष्ट्रीयत्व भिन्न-भिन्न असून, आपली स्वत:ची वेगवेगळी भूमी असण्याचा त्याना हक्क आहे. भारत व पाकिस्तान ही दोन राष्ट्रे आहेत हे आम्ही मान्य करतो. परन्तु धर्मावर आधारलेल्या द्विराष्ट्रवाद सिध्दांताचे आम्ही खंडन केले आहे, आम्ही त्याचा धि:कार करतो. हिंदू व मुसलमान यांची दोन पृथक राष्ट्रे असतील तर मग, भारतातील पाच कोटी मुसलमान, त्यांच्याच घरात परके म्हणून राहात आहेत असा त्याचा अर्थ होईल. धर्म हाच राष्ट्रीयतेचा

एकमेव आधार असू शकतो, हा सिध्दांत मान्य करायला आम्ही तयार नाही. विविध वंशांचे, धर्मांचे व भाषांचे लोक राहात असलेली समाजव्यवस्था असली पाहिजे व अशा समाजव्यवस्थेच्या यशस्वितेवर जगातील शांतता व सद्‌भाव अवलंबून आहे, अशी आमची श्ध्दा आहे. अलीकडेच स्वतंत्र झालेल्या बऱ्याच आफ्रिकी देशांना हे विचार ग्राह्य वाटतील अशी माझी खात्री आहे. त्यांच्यापैकी बहुतेक देशात, निरनिराळया धर्मांचे लोक राहात आहेत. बऱ्याच पश्चिम आशियाई देशात सुध्दा हीच स्थिती आहे व खुद्द अमेरिकेत, तेथे राहात असलेल्या निरनिराळया वंशांच्या लोकांना एकरूप व एकात्म करण्या ा एक धाडसी प्रयत्न केला जात आहे.

## भारतीय मुसलमान भारताच्या पाठीशी

आपण भारतीय मुसलमानांचे रक्षणकर्ते आहोत, असे पाकिस्तान पक्षा फोडून सागत असला तरी प्रत्यक्षात भारतातील मुसलमानांनी नेहमीच माझ्या देशाच्या सरकारच्या धोरणाला जोरदार पाठिंबा दिलेला आहे, ही गोष्ट असाधारण नाही का ?

अध्यक्षांच्या परवानगीने, भारतातील मुस्लिम वर्तमानपत्रामधील तीन उतारे मी वाचून दाखवतो. ते उर्दूत आहेत. परंतु माझ्याजवळ त्यांचा अनुवाद आहे:—

पहिला उतारा, कानपूरच्या सियासत-ए-जदीद या वर्तमानपत्राच्या १६ जानेवारीच्या अंकातील आहे, तो असा—

"भारतातील अल्पसंख्य मुसलमानांविषयी आपल्याला अत्यन्त सहानुभूती वाटते असे सांगून, पाकिस्तानी अधिकारी व पत्रकार आपल्या या भावनेचे प्रदर्शन करतात व भाषणे करून आणि लेख लिहून त्यांच्या दुःस्थितीविषयी दुःख व्यक्त करतात. परंतु ताळतंत्र नसलेल्या त्यांच्या प्रक्षोभक वक्तव्यामुळे व, लिखाणामुळे, भारतातील मुसलमानांना मात्र हालअपेष्टा भोगाव्या लागत आहेत, याची त्यांना जाणीव नाही. भारतातील मुसलमानांना, या मूर्ख मित्रांना हे

स्पष्टपणे सांगावेसे वाटते की त्यानी कृपा करुन, ही असली नसती उठाठेव करू नये."

२१ जानेवारीच्या 'नई दुनिया' या वर्तमानपत्राच्या अंकातील उतारा—

"बहुसंख्य लोकांच्या भावना प्रक्षुब्ध होतील अशा रीतीने पाकिस्तानी वर्तमानपत्रानी, पुढाऱ्यांनी व रेडिओने, पवित्र केसाच्या चोरीची घटना, भर देऊन सांगितली. पाकिस्तानातील वर्तमानपत्रे, पुढारी व रेडिओ, अशा बेजबाबदार रीतीने वागले नसते तर खुलना व जेसोर येथील गुंडांना, हिंदूच्या जीवितावर व मालमत्तेवर हल्ला करण्याचे धारिष्ट्य झाले नसते."

ही दोन ठिकाणे, पूर्व पाकिस्तानात आहेत.

तिसरा उतारा, १८ जानेवारीच्या मद्रासच्या 'मुसलमान' या वर्तमानपत्रातील आहे, तो असा—

"पवित्र केसाची चोरी झाल्यानंतर काश्मीरमध्ये जी दंगल सुरू झाली ती तेवढ्या भागापुरतीच मर्यादित राहायला हवी होती. परन्तु, पाकिस्तानी नागरिकांनी अविचाराने, वागून दंगल माजवली व तेथील निरपराधी मुसलमानेतरांवर अत्याचार केले. यामुळे कलकत्यात हिंदु-मुसलमानांचे दंगे झाले व कलकत्यातील निरपराधी मुसलमानांना त्याची झळ सोसावी लागली."

भारतविरोधी मोहिमेतून व भारताची निंदानालस्ती करून पाकिस्तानला कोणती गोष्ट साध्य करायची इच्छा आहे, असा प्रश्न कुणीही स्वतःला विचारील. जातीय भावना उत्तेजित करून, धर्मांधता व असहिष्णुता भडकावून, आणि जिहादची--पवित्र युध्दाची--भाषा वापरून, पाकिस्तान भारतातील मुसलमानांचे हित करीत आहे काय ? येथे मला हे ओझरते सांगावेसे वाटते की कोणतेही युध्द पवित्र नसते. प्रत्येक युध्द निर्दय, रक्तपिपासू असते व त्यामुळे, लोकांना अत्यन्त हालअपेष्टा व दुःखे भोगावी लागतात, हे न समजण्याइतका पाकिस्तान भोळा आहे असे मला वाटत नाही. त्याला भारतात बेबनाव व दंगल माजलेली पाहायची आहे. आंतरराष्ट्रीय कायद्याप्रमाणे, मुंबई किंवा दिल्ली हा भारतीय प्रदेशाचा जितका अविभाज्य भाग आहे, तितकाच अविभाज्य भाग असलेल्या

एका प्रदेशाचा जो टापू त्याने बेकायदेशीरपणे बळकावला आहे तो स्वतः—कडेच ठेवता येण्याची संधी मिळवण्याकरता, राजकीय व आर्थिक दृष्टीने भारत दुबळा व्हावा, अशी त्याची इच्छा आहे. भारताला आतून दुबळे करण्याचा चीनचा जो प्रयत्न चालला आहे, तोच त्यानेही चालवलेला असून चीन-पासून स्वतःचे संरक्षण करण्याच्या भारताच्या सिध्दतेला तो सुरुंग लावीत आहे. माझ्या सरकारच्या वतीने मला हे स्पष्ट करावेसे वाटते की, काय वाटेल ते होवो, आणि मी पुन्हा सांगतो, काय वाटेल ते होवो, भारतातील कोणतेही सरकार, मग ते कोणत्याही पक्षाचे असो, देशाच्या ऐक्याला, एकात्मतेला व एकरूपतेला तिलांजली द्यायला कधीही तयार होणार नाही.

## पाकिस्तानचा असमर्थनीय दृष्टिकोन

या प्रश्नाचा विचार करण्यासाठी सुरक्षितता मंडळाची बैठक भरवण्यात यावी, ही पाकिस्तानने केलेली मागणी समर्थनीय ठरेल असे अलीकडे काहीही घडलेले नाही, हे मी यापूर्वी सांगितलेच आहे. १६ जानेवारी, १९६४च्या सुरक्षितता मंडळाच्या अध्यक्षांना पाठवलेल्या पत्रात त्याने असे म्हटले आहे की जम्मू व काश्मीरमध्ये, गंभीर परिस्थिती उद्भवली असून, या राज्याचा खास दर्जा नष्ट करण्यासाठी भारत सरकार सतत जे बेकायदेशीर उपाय योजीत आहे त्याचा हा प्रत्यक्ष परिणाम आहे. पत्रात आणखी असे म्हटले आहे की जम्मू व काश्मीर भारताला जोडण्याचा भारताचा डाव असून भारत सरकार सुरक्षितता मंडळाचा अधिकार जाणूनबुजून धाब्यावर बसवीत आहे व जम्मू आणि काश्मीर भारतीय संघराज्यात विलीन करीत आहे पाकिस्तानची ही तक्रार नवी नाही. भारताच्या संसदेत, जम्मू व काश्मीरच्या प्रतिनिधी-साठी चार जागा राखून ठेवण्याचा निर्णय घटना समितीने घेतला. तेव्हा जून, १९४९ मध्ये पाकिस्तानने अशीच तक्रार केली होती. शुध्द कायद्याच्या कारणास्तव, भारत सरकारने योजलेल्या उपायाला विरोध करणे कठीण आहे या कारणामुळे त्या वेळी, याबाबत कोणतीही कृती करायचे संयुक्त राष्ट्रांच्या मंडळाने नाकारले. त्यानंतर ज्या ज्या वेळी काही बदल करण्यात आले, त्या त्या वेळी पाकिस्तानने अशाच प्रकारची तक्रार केली. या ताज्या तक्रारीसंबंधी

सांगायचे म्हणजे पाकिस्तानच्या कायम प्रतिनिधीच्या ९ ऑक्टोबर, १९६३ च्या पत्रात (एस् ५४३७) ही तक्रार यापूर्वीच करण्यात आली आहे. १३ नोव्हेंबर, १९६३ रोजी भारताने या पत्राला उत्तर पाठवले. (एस्-५४५४) पाकिस्तानच्या कायम प्रतिनिधीनें ५ जानेवारी १९६४ रोजी आणखी एक पत्र पाठवून त्याच तक्रारी पुन्हा मांडल्या. (एस्-५५०४). जम्मू व काश्मीरमध्ये गंभीर परिस्थिती उद्भवली आहे, म्हणून तिचा विचार करण्यासाठी सुरक्षितता मंडळाची तातडीनें बैठक बोलावण्यात यावी, अशी मागणी पाकिस्तानच्या परराष्ट्रमंत्र्यांनी आपल्या १६ जानेवारी, १९६४ च्या पत्रात केली आहे. परंतु, तिचें समर्थन करता येईल, अशी कोणतीही नवी घटना घडलेली नाही.

## संस्थानांचे सामीलीकरण—पार्श्वभूमी

आम्ही काश्मीर, भारतीय संघराज्याला जोडण्याचा किंवा भारतीय संघराज्यात 'विलीन' करण्याचा प्रयत्न करीत आहोत, असा आरोप पाकिस्तानने केला आहे. वास्तविक काश्मीरच्या महाराजांनी, भारताबरोबरच्या सामीलनाम्यावर शिक्कामोर्तब केले व त्या वेळचे भारताचे गव्हर्नर-जनरल लॉर्ड माउंटबॅटन, यांनी जेव्हा ते स्वीकारले, तेव्हाच कायद्याच्या आणि घटनेच्या दृष्टीनें काश्मीर भारतीय संघराज्याचा अविभाज्य भाग बनला. स्वातंत्र्यापूर्वी, भारतातील राजकीय व घटनाविषयक परिस्थिती काय होती, हे पाहणे आवश्यक आहे. स्वातंत्र्यापूर्वी, ब्रिटिश भारत अस्तित्वात होता व त्यावर इंग्लंडचें संपूर्ण सार्वभौमत्व होतें. भारतात, ५६० हून जास्त संस्यानेंही होती. ती निम-स्वतंत्र होती व सर्वश्रेष्ठ सत्तेच्या सिध्दांतानुसार त्यांचे संरक्षण इंग्लंड करीत होते. या सिध्दांताचा अर्थ असा की, इंग्लंडचा राजा व भारताचा सम्राट, या संस्थानांचा सर्वसत्ताधीश होता व संस्थानिकांच्या राजनिष्ठेचा मोबदला म्हणून, तो त्यांचे रक्षण करीत असे. जेव्हा ब्रिटिश पार्लमेंटने भारतीय स्वातंत्र्य कायदा मंजूर केला तेव्हा ब्रिटिश भारतातील सत्ता, भारतीय लोकांकडे सोपवण्यात आली आणि सर्वश्रेष्ठ सत्ताधीशाची भूमिकाही ब्रिटनने संपुष्टात आणली व भारत आणि पाकिस्तान

यांच्या सरकारांशी योग्य वाटेल तशी करार व्यवस्था करण्याची मोकळीक त्यांनी संस्थानिकांना दिली. त्याचबरोबर भारताची फाळणी करण्यात आली. व पाकिस्तान निर्माण झाले. परंतु आजचे भारत सरकार, हे ब्रिटिश सरकारचे उत्तराधिकारी सरकार होते व पाकिस्तान, हे एक नवे राष्ट्र अस्तित्वात आले होते. कोणत्याही संस्थानिकाला त्याच्या मर्जीनुसार भारतात किंवा पाकिस्तानात सामील होण्याचे स्वातंत्र्य देण्याचीही तरतूद करण्यात आली होती. सामीलनामा सशर्त असू शकण्याची तरतूद कायद्यात नव्हती. भारताच्या गव्हर्नर-जनरलने किंवा पाकिस्तानने एकदा सामीलनामा स्वीकारला म्हणजे ते विशिष्ट संस्थान या दोन देशांपैकी संबंधित देशाचा अविभाज्य भाग होईल अशी तरतूद होती. संस्थानातील लोकांशी विचारविनिमय करण्याची तरतूद त्यात नव्हती, ही गोष्ट लक्षात घेणे महत्त्वाचे आहे. तसेच, सामील होऊ इच्छिणाऱ्या संस्थानातील लोकांचे मत माहीत करून घेऊन, सामीलीकरणाच्या निर्णयाला त्यांची मंजूरी मिळवणे आवश्यक आहे, अशीही तरतूद नव्हती. जम्मू आणि काश्मीरचा प्रश्न आपण क्षणभर बाजला ठेऊ कित्येक संस्थाने, या कायद्याप्रमाणे, भारतात किंवा पाकिस्तानात सामील झाली आहेत. ही सामीलीकरणे, कोणत्याही प्रकारे अपूर्ण आहेत किंवा ती निर्णायक ठरण्यासाठी काही तरी औपचारिक कृती करणे आवश्यक आहे, असे भारताने किंवा पाकिस्तानने कधीही सूचित केलेले नाही. फक्त जम्मू आणि काश्मीरच्या बाबतीतच, पाकिस्तानला लोकशाहीचा आणि स्वयनिर्णयाचा एवढा उमाळा आला आहे.

भारताची फाळणी, ब्रिटिश भारतापुरतीच मर्यादित होती. आणि सरहद्द आखताना, मुसलमान बहुसंख्येने असलेल्या केवळ ब्रिटिश भारतातील प्रांताच्याच प्रश्नाचा विचार करण्यात आला. संस्थानांमध्ये कोणत्या धर्मांचे किती लोक आहेत, हा प्रश्नच नव्हता. एखाद्या संस्थानाने भारतात सामील व्हावे की पाकिस्तानात सामील व्हावे, हा प्रश्न सर्वस्वी, त्या संस्थानाच्या अधिपतीवर सोपवला होता. जम्मू व काश्मीरमध्ये मुसलमान प्रचंड बहुसंख्येने आहेत या कारणास्तव व पाकिस्तान हे एक मुसलमान राष्ट्र म्हणून अस्तित्वात

आन्रामुळे, हे राज्य स्वाभाविकपणे, पाकिस्तानचा भाग बनला पाहिजे, अशी सूचना पाकिस्तानने वेळोवेळी मांडली आहे. कायद्याच्या व घटनाविषयक स्थितीकडे पाहण्याचा हा सर्वस्वी चुकीचा दृष्टिकोन आहे.

जी फाळणी करण्यात आली ती केवळ ब्रिटिश भारताचीच करण्यात आली आहे व फाळणीचे तत्त्व, भारतीय संस्थानाधिपतींच्या अंमलाखाली असलेल्या काश्मीरला व इतर शेकडो संस्थानांना लागू होत नाही हे ब्रिटिश सरकारने पूर्णपणे स्पष्ट केले होते. ३ जून, १९४७ च्या ब्रिटिश सरकारच्या घोषणेतील काही भाग मी येथे उद्धृत करतो. "वर जाहीर केलेले निर्णय (फाळणीविषयी) केवळ ब्रिटिश भारतासंबंधीच आहेत व भारतीय संस्थानांविषयीचे ब्रिटिश सरकारचे जे धोरण कॅबिनेट मिशनच्या १२ मे १९४६ च्या निवेदनपत्रकात दिलेले आहे, त्यात कोणताही बदल झालेला नाही, हे ब्रिटिश सरकारला स्पष्ट करावेसे वाटते."

कॅबिनेट मिशनच्या निवेदनपत्रातील मजकूर असा आहे :—

"ब्रिटिश सरकार, सर्वसत्ताधीशाचा अधिकार वापरणार नाही. याचा अर्थ असा की इंग्लंडच्या राजाबरोबरच्या संबंधातून निर्माण झालेले संस्थानांचे हक्क, यापुढे राहाणार नाहीत व संस्थानांनी सर्वश्रेष्ठ सत्तेकडे सोपवलेले सर्व हक्क परत संस्थानांना मिळतील. अशा रीतीने, संस्थाने व इंग्लंडचा राजा यांच्यामध्ये असलेली राजकीय व्यवस्था संपुष्टात आणली जाईल. यामुळे जी पोकळी निर्माण होईल ती, ब्रिटिश भारतात, नंतर येणारे सरकार किंवा सरकारे, यांच्याशी फेडरल स्वरूपाचे संबंध स्थापन करून किंवा तसे न केल्यास त्या सरकारबरोबर किंवा सरकारांबरोबर विशिष्ट राजकीय व्यवस्था स्थापन करून संस्थानांना भरून काढावी लागेल."

१९४७ च्या भारतीय स्वातंत्र्याच्या कायद्यानुसार १९३५ च्या गव्हर्मेंट ऑफ इंडिया अॅक्टमध्ये जे बदल करण्यात आले, त्यात सामीलीकरणाची तरतूद करण्यात आली.

## पाकिस्तानचे दडपण आणण्याचे डावपेच व टोळयांचे हल्ले

बहुतेक संस्थानिकांनी, १५ ऑगस्ट, १९४७ पूर्वी, भारतात किंवा पाकिस्तानात सामील होण्याचा निर्णय घेतला. परंतु काश्मीरच्या महाराजांनी निर्णय केला नाही. हा निर्णय घेईपर्यंत, दळणवळण, पुरवठा व टपाल आणि तार खाते या बाबतची व्यवस्था. आहे तशीच ( जैसे थे करार ) कायम राखण्याचा करार करण्याची त्यांनी भारत व पाकिस्तान या दोघानाही विनंती केली. पाकिस्तानने 'जैसे थे' करार केला. परंतु भारताबरोबर करार होण्यापूर्वीच टोळयांचे हल्ले सुरू झाले. हा करार केला असताना सुध्दा, पाकिस्तानने, दळणवळण तोडून टाकून व आवश्यक वस्तूंचा पुरवठा बंद करून काश्मीरवर दडपण आणले. या दडपणाचा काही उपयोग न झाल्यामुळे. पाकिस्तानच्या नागरिकांनी व टोळयानी सशस्त्र हल्ले केले. काश्मीरच्या महाराजांनी पाकिस्तानला अनेक वेळा विनंती केली. परंतु त्यांचा काही उपयोग झाला नाही. हल्लेखोरांनी काश्मीरच्या निरनिराळया भागात धुमाकूळ घातला. इतक्या मोठ्या संख्येने आलेल्या हल्लेखोराचा, प्रभावी रीतीने प्रतिकार करायला, काश्मीरच्या फौजा असमर्थ होत्या. त्यानंतर भराभर घटना घडल्या आणि काश्मीर खोऱ्याला अतिशय धोका निर्माण झाला. हल्लेखोर स्थानिक लोकांची सर्रास कत्तल करीत होते, आगी लावीत होते, व नाना प्रकारचे अत्याचार करीत होते. त्यांना प्रतिबंध करायला असमर्थ ठरल्यामुळे, महाराजानी भारत सरकारला अशी विनंती केली की जम्मू आणि काश्मीर भारतीय डोमिनियनमध्ये सामील होऊ द्यावे. त्याचबरोबर महाराजांच्या अंमलापासून मुक्त होण्यासाठी व लोकांच्या हक्कासाठी लढा देत असलेल्या, काश्मीरमधील लोकांच्या सर्वात मोठ्या संघटनेने, नॅशनल कॉन्फरन्सने, भारत सरकारकडे मदतीची विनंती केली. हे संस्थान भारतात सामील करून घेण्याच्या महाराजांच्या विनंतीसही कॉन्फरन्सने पाठिंबा दिला. पाकिस्तानच्या परराष्ट्र मंत्र्यांनी ज्यांच्याविषयी इतके प्रशंसोद्गार काढले आहेत, ते त्या वेळचे नॅशनल कॉन्फरन्सचे पुढारी शेख अब्दुल्ला यांनी काय म्हटले होते, याकडेही मी मंडळाचे लक्ष वेधू इच्छितो.

"हल्लेखोर श्राल्याने श्रीनगरजवळ येऊ लागले तेव्हा संपूर्ण संस्थान बेचिराख होण्यापासून वाचवण्याचा एकच मार्ग आमच्यासमोर होता व तो म्हणजे शेजारच्या मित्राची मदत घेणे. म्हणून, भारत सरकारची मदत घेण्यासाठी, नॅशनल कॉन्फरन्सचे प्रतिनिधी विमानाने नवी दिल्लीला गेले. परंतु आमचे संस्थान व भारत यांच्यात कोणतेही सनदशीर संबंध स्थापन झालेले नसल्यामुळे, आक्रमकांचे पारिपत्य करण्यासाठी, कोणतीही प्रभावी मदत करणे भारताला अशक्य होते. खुद्द लोकांच्या प्रतिनिधींनीच करार करण्याची इच्छा प्रदर्शित केल्यामुळे, भारत सरकारने तिचा स्वीकार केला. कायद्याच्या दृष्टीने, सामीलीकरण पत्रावर संस्थानाच्या महाराजांनी सही करायला हवी होती ती त्यानी केली."

शेख अब्दुल्लांनी हा कौल दिला आहे. आणि काश्मीरी लोकांशी झालेला विचारविनिमय व काश्मीर भारतात सामील व्हावे म्हणून त्याच्यावर दडपण आणले नाही, ही सत्यस्थिती, या दोन्ही दृष्टींनी, पाकिस्तान हा कौल स्वीकारील अशी मला आशा वाटते.

मी यापूर्वी सांगितलेच आहे की गव्हर्नर-जनरल लॉर्ड माउंटबॅटन यांनी सामीलीकरणपत्रे स्वीकारले. २२ डिसेंबर, १९४७ रोजी भारताच्या पंतप्रधानांनी पाकिस्तानला पत्र पाठवून हल्लेखोरांना मदत न करण्याची व लढा न लांबवण्याची त्याला विनंती केली. ३० डिसेंबर, १९४७ रोजी पाकिस्तानच्या पंतप्रधानांनी त्याला उत्तर पाठवले. त्यातील मजकूर असा:—

"पाकिस्तान सरकार हल्लेखोराना मदत करीत आहे, हा आरोप आम्हाला साफ अमान्य आहे. उलट, लढाई खेरीज अन्य सर्व मार्गांचा अवलंब करून या हल्लेखोराना परावृत्त करण्याचे पाकिस्तानने शक्य ते सर्व प्रयत्न केले आहेत."

१ जानेवारी, १९४८ रोजी, आम्ही सुरक्षितता मंडळाकडे दाद मागितली या तारखेच्या आमच्या पत्रातील मजकूर असा:—

"जम्मू व काश्मीरवरील हल्ल्यांसाठी हल्लेखोरांना, पाकिस्तानकडून मदत मिळत असल्यामुळे, भारत व पाकिस्तान यांच्यात आज अशी परिस्थिती निर्माण झाली आहे. या हल्लेखोरात, पाकिस्तानी नागरिक व वायव्येकडे पाकिस्तानला लागून असलेल्या प्रदेशातील जमाती टोळ्यांचे लोक आहेत अशी मदत देणे, हे भारताविरुध्द केलेले आक्रमक कृत्य असून, ही मदत देण्याचे तावडतोब थांबवायला मंडळाने पाकिस्तानला सांगावे, अशी भारत सरकारची विनंती आहे."

## संयुक्त राष्ट्रांसमोरील मूळ फिर्याद भारताची

सुरक्षितता मंडळासमोर फिर्यादी म्हणून आम्ही गेलो होतो व पाकिस्तानने आक्रमण केल्याची तक्रार आम्ही केली होती हेही एक अत्यंत महत्त्वपूर्ण सत्य आहे. परंतु, त्या घटनेनंतर इतका कालावधी लोटल्यामुळे, या सत्याकडे बरेच वेळा दुर्लक्ष केले जाते. पाकिस्तान सरकार हल्लेखोरांना मदत करीत आहे व त्याने भारताविरुध्द आक्रमक कृत्य केले आहे, हे पाकिस्तानच्या परराष्ट्र मंत्र्यांनी १५ जानेवारी, १९४८ रोजी पुन्हा ठामपणे अमान्य केले. उलट आपल्या सरकारने, युध्दाखेरीज बाकी सर्व मार्गांचा अवलंब केला व हल्लेखोराना परावृत्त करण्यासाठी शक्य ते सर्व काही केले, असे पाकिस्तानच्या परराष्ट्र मंत्र्यानी सांगितले त्यानी आणखी असे सांगितले की पाकिस्तान सरकार हल्लेखोरांना मदत देत आहे किंवा, त्यांचे तळ पाकिस्तानच्या प्रदेशात आहेत किंवा पाकिस्तानचे लष्कर त्याना लष्करी शिक्षण देत आहे, असा भारत सरकारने जो आरोप केला आहे, तो पूर्णपणे निराधार आहे. भारतात काश्मीरमध्ये असण्याचा हक्क नाही, असा दावा पाकिस्तानने कधीही केला नाही. टोळीवाल्यांच्या हल्ल्याच्या पाठीशी पाकिस्तान होते याचा पाकिस्तानने निःसंदिग्धपणे केलेला इन्कार हे संपूर्ण काश्मीर प्रश्नाचे अत्यंत महत्त्वाचे अंग आहे. त्या वेळी, काश्मीरमधील स्वतःच्या उपस्थितीचे समर्थन करण्याचा किंवा काश्मीरमध्ये असण्याचा आपल्याला हक्क आहे, असा दावा करण्याचा पाकिस्तानने कधीही प्रयत्न केला नाही, ही अत्यंत सूचक गोष्ट आहे

काश्मीरमधील आपली उपस्थिती आंतरराष्ट्रीय कायद्याच्या विरुध्द आहे, याची आपल्या कृतीच्या बेकायदेशीरपणाची पाकिस्तानला पूर्ण जाणीव होती, हे उघड आहे. याच कारणास्तव, काश्मीरमधील आपले अस्तित्व पाकिस्तान मान्य करून शकत नव्हता व याच कारणास्तव, काश्मीरमधील आपल्या अस्तित्वाचा, त्याने, सरळ व पूर्णपणे इन्कार केला मी हीं जी सत्यस्थिती विशद केली आहे, त्यावरून हे स्पष्टपणे दिसून येते की काश्मीरमधील विमोचन चळवळीला पाठिंबा देण्यासाठी पाकिस्तान काश्मीरमध्ये गेला असे जे पाकिस्तान आता म्हणत आहे, ती निःसंशय त्याला नंतर सुचलेली कल्पना आहे व काश्मीरवरील आक्रमणाच्या नैतिक समर्थनाचा आभास निर्माण करणे, हा तिच्यामागील हेतू आहे. पाकिस्तानने नंतर जे कबुलीजबाब दिले आहेत, त्यावरून हे स्पष्ट होते की हा केवळ दुटप्पी बोलण्याचा प्रकार नाही तर जाणूनबुजून केलेला खोटारडेपणा आहे.

१ जानेवारी, १९४८ च्या भारत सरकारच्या तक्रारीला उत्तर देताना, काश्मीरचे सामीलीकरण, दगलबाजी व जबरदस्ती करून भारताने प्राप्त केले, असे पाकिस्तानने १५ जानेवारीला सूचित करून काश्मीरच्या सामीलीकरणाच्या कायदेशीरपणाबद्दल शंका व्यक्त केली. दगलबाजी व जबरदस्ती यांच्यामुळे सामीलीकरण रद्द झाले आहे, असे सिध्द न झाल्यास ते सामीलीकरण, पूर्णपणे कायदेशीर व बंधनकारक असते हे स्पष्ट आहे. दगलबाजी व जबरदस्तीच्या प्रश्नासंबंधी असे सांगता येईल की लॉर्ड माउंटबॅटन यांनी सरकारच्या वतीने काश्मीरच्या महाराजांना असे सांगितले की, "तुमची इच्छा असल्यास तुम्ही पाकिस्तानात सामील होऊ शकता व तुम्ही तसे केल्यास, ती शत्रुत्व द्योतक कृती आहे, असे आम्ही मानणार नाही." सामीलीकरणापूर्वी, हल्लेखोर टोळीवाल्यांशी लढण्यासाठी एकही भारतीय सैनिक पाठवण्यात आला नव्हता, ही गोष्टही सर्वांना माहीत आहे. जम्मू व काश्मीर संस्थान व त्यांचे महाराज, यांच्यावर जबरदस्ती जर कोणी केली असेल तर ती पाकिस्तानने. जम्मू व काश्मीरच्या महाराजांना भारतात सामील होणे जर भा। पडले असेल तर ते भारताने नव्हे तर पाकिस्तानने जबरदस्ती केली

म्हणून. जी दगलबाजी व जबरदस्ती केल्याची पाकिस्तानने तक्रार केली आहे, ती भारताने नव्हे तर खुद्द पाकिस्ताननेच केलेली दगलबाजी व जबरदस्ती असून, आपल्या स्वतःच्याच बेकायदेशीर कृत्यांच्या आधारे करारातील कोणताही पक्ष, कराराच्या कायदेशीरपणाबद्दल आक्षेप घेऊ शकत नाही किंवा तो रद्दबातल ठरवू शकत नाही, हे समजण्यासाठी कायद्याचे फार खोल ज्ञान असण्याची गरज नाही.

पाकिस्तानच्या परराष्ट्र मंत्र्यांनी असे म्हटले आहे की जम्मू व काश्मीरमधील लोकांनी तेथील महाराजाविरुध्द बंड पुकारले असताना, आणि त्यांचा अधिकार झुगारून दिला असताना सुध्दा भारताने, सामीलीकरण-पत्रावर महाराजांची सही घेतली. हा वस्तुस्थितीचा धडधडीत विपर्यास आहे. ज्या काश्मीरच्या भवितव्याविषयी पाकिस्तानला आज इतकी काळजी वाटते आहे, त्या काश्मीरमध्ये शस्त्रास्त्रे घेऊन अत्याचार जर कोणी केले असतील व धुमाकूळ जर कोणी घातला असेल तर तो हल्लेखोर टोळीवाले व पाकिस्तानी नागरिक यांनी व त्यांना मदत कोणी केली असेल, व काश्मीरच्या महाराजाना, या अत्यंत कठीण प्रसंगी भारताकडे धाव घ्यायला जर कोणी भाग पाडले असेल तर ते पाकिस्तान सरकारनेच. आता आपण पुन्हा एकदा शेख अब्दुल्लांकडे वळू. त्या काळी घडलेल्या घटनांची प्रत्यक्ष माहिती असलेल्या व्यक्तींची साक्ष या दृष्टीने, ते काय म्हणाले हे फार महत्त्वपूर्ण आहे

"श्रीनगरमधील लोकांनी जेव्हा प्रथमच भारताकडून येणारी विमाने पाहिली व भारतीय लष्कराचे रणगाडे येथील रस्त्यांतून फिरताना पाहिले तेव्हा त्यांच्या मनातील निराशा व यातना नष्ट होऊन त्यांना फार आनंद झाला. येथील मुसलमान, हिंदू व शीख या सर्व लोकांनी सुटकेचा निःश्वास टाकला. आपल्या प्रतिष्ठेचे व इभ्रतीचे आता रक्षण होईल या विचाराने त्यांना हायसे वाटले. ते दिवस आपण विसरता कामा नये."

एका जुलुमी महाराजानी सामीलीकरणपत्रावर सही केली असेही पाकिस्तानच्या परराष्ट्रमंत्र्यांनी निवदन केले आहे. ज्या की संस्थाने पाकिस्तानात सामील झाली आहेत, ते सर्व संस्थानिक लोकशाहीचे पुतळे होते काय ?

## पाकिस्तानने उशीरा दिलेले कबुलीजबाब

भारत व पाकिस्तान यांच्या विषयीच्या संयुक्त राष्ट्रांच्या मंडळाने, जुलै, १९४८ मध्ये कराचीला भेट दिली तेव्हा मात्र, टोळीवाल्यांच्या हल्ल्यासंबंधीची आपली भूमिका अगदी धुतल्या तांदळासारखी आहे असे सांगता येणे पाकिस्तानला शक्य नव्हते., सर महमद झाफरूल्लाखान यांनी मंडळाला सांगितले की मे १९४८ पासून, पाकिस्तानच्या नियमित सैन्यांमधील तीन ब्रिगेड काश्मीरच्या प्रदेशात लढत आहेत.

१३ ऑगस्ट, १९४८ आणि ५ जानेवारी १९४९ चे मंडळाचे जे ठराव आम्ही स्वीकारले—आणि १७ जानेवारी, १९४८ च्या ठरावाखेरीज आम्ही केवळ हेच दोन ठराव मान्य केले—ते याच संदर्भात समजावून घेतले पाहिजेत. जम्मू आणि काश्मीरच्या काही भागातील पाकिस्तानची उपस्थिती बेकायदेशीर आहे व त्याने आपले आक्रमक सैनिक काढून घेतलेच पाहिजेत, हाच या ठरावांचा आधार होता. १३ ऑगस्टच्या दोन अ (१) या परिच्छेदातील शब्दप्रयोगावरून ही गोष्ट स्पष्ट होते:

"जम्मू व काश्मीरच्या प्रदेशात, पाकिस्तानचे सैनिक असल्यामुळे, परिस्थितीत महत्त्वाचा बदल घडून आला आहे, व त्यामुळे, पाकिस्तान सरकार काश्मीरमधील आपल्या फौजा काढून घेण्याचे मान्य करते."

ही अट पूर्ण करणे आवश्यक असून पाकिस्तानने ती पूर्ण केल्यानंतरच काश्मीरमध्ये सार्वमत घेण्याची शक्यता निर्माण होऊ शकली असती. पाकिस्तानने जी धडधडीत बेकायदेशीर गोष्ट केली आहे व आंतरराष्ट्रीय कायद्याचा जो धडधडीत भंग केला आहे, तो तसाच कायम असताना सुरक्षितता मंडळाने भारताला सार्वमत घ्यायला सांगितले असणे शक्य नाही, ही गोष्ट स्पष्ट आहे. एका देशाने दुसऱ्या देशावर धडधडीत आक्रमण करावे, या गोष्टीला सुरक्षितता मंडळ बहुधा पाठिंबा देऊ शकले नाही. पाकिस्तान जेव्हा सुरक्षितता मंडळाकडे दाद मागतो तेव्हा, आपले आक्रमक सैनिक काढून न घेतलेला एक आक्रमक देश दाद मागीत आहे, या गोष्टीचे बहुधा विस्मरण होते. मला असे म्हणावयाचे

आहे की पाकिस्तानने या आदरणीय संघटनेचा धडधडीत अवमान केला असून जोपर्यंत, तो आपल्या चुकांचे परिमार्जन करीत नाही तोपर्यंत त्याला आपले म्हणणे मांडायचा अधिकार नाही. त्याने आपल्या चुकांचे परिमार्जन केलेले नाही व तो आपल्या आक्रमणाचे समर्थन करीत आहे. केवळ एवढेच नव्हे तर सं.रा.च्या भारत-पाकिस्तान मंडळाने जे सामीलीकरण मान्य केले आहे व ज्या सामीलीकरणामुळे काश्मीरमधील पाकिस्तानचे अस्तित्व बेकायदेशीर व आंतरराष्ट्रीय कायद्याच्या विरुद्ध ठरले आहे, त्या सामीलीकरणाच्या कायदेशीरपणाला तो आक्षेप घेत आहे.

## पाकिस्तानचे आक्रमण आजही चालू आहे

सुरक्षितता मंडळासमोरील आपली स्वतःची भूमिका व भारताची भूमिका फिरवून पाकिस्तानला त्या उफराट्या करून देण्याइतकी स्मरणशक्ती तोकडी असावी, याचे मला कधी कधी आश्चर्य वाटते. जिच्यावर अन्याय करण्यात आलेला आहे अशा एका निरपराध व्यक्तीचे सोंग घेऊन पाकिस्तान येथे आला आहे, व आम्हीच आक्रमक आहोत, असे आरोप तो आमच्यावर करीत आहे. काश्मीरच्या प्रश्नाबाबतची चर्चा बरोबरच पुरेशी प्रदीर्घ झाली आहे. ही संपूर्ण चर्चा चालू असताना, पाकिस्तान आक्रमक राहिला आहे. आज सुद्धा, तो आक्रमक आहे व भारताच्या एका अविभाज्य भागात, भारत जे काही करीत आहे, त्याविरुद्ध तक्रार करायचा त्याला अजिबात हक्क नाही, असे मला म्हणायचे आहे.

सामीलीकरण झाले असले तरी, काश्मीर हा भारताचा भाग बनण्या-विषयी, जम्मू व काश्मीरमधील लोकांची इच्छा काय आहे, हे जाहीर करून घेतले जाईल, अशी आश्वासने कित्येक प्रमुख भारतीय अधिकाऱ्यांनी दिली असे सांगण्यात आले आहे ज्या आश्वासनाचा पाकिस्तानच्या परराष्ट्र मंत्र्यांनी आपल्या भाषणात उल्लेख केला आहे, ती नेहमी एका अटीवर देण्यात आली व ती अट म्हणजे, पाकिस्तानने प्रथम आपले सैनिक काश्मीरमधून काढले पाहिजेत. भारताचे गव्हर्नर-जनरल लॉर्ड माउन्टबॅटन यांनी २७ ऑक्टोबर, १९४७ रोजी पाठविलेल्या पत्रात असे म्हटले होते की, "काश्मीरमधे शांतता

व सुव्यवस्था पुन्हा स्थापन झाल्यानंतर व काश्मीरमधील सर्व हल्लेखोरांना हाकलून लावल्यानंतर काश्मीरच्या सामीलीकरणाचा प्रश्न, लोकांच्या इच्छा अजमावून सोडवण्यात यावा, अशी माझ्या सरकारची इच्छा आहे."

"काश्मीरमध्ये शातता व सुव्यवस्था पुन्हा स्थापन झाल्यानतर व काश्मीरमधील सर्व हल्लेखोराना हाकलून लावल्यानंतर" या शब्दांवर मी भर देतो. या गोष्टीला आज १६ वर्षे झाली असली तरी आजसुध्दा, हल्लेखोरांनी काश्मीरचा दोन पंचमांश भाग बेकायदेशीरपणे बळकावलेला आहे. भारताचे पतप्रधान श्री नेहरू यांनी किंवा अन्य कोणीही लोकाची इच्छा अजमावून घेण्याचे जेव्हा जेंव्हा निवेदन केले तेंव्हा तेंव्हा, पाकिस्तानने काश्मीरमधून निघून गेले पाहिजे, ही आमची मागणी प्रथम पूर्ण करण्याच्या सदर्भातच हे निवेदन करण्यात आले.

सार्वमत, हे लोकांची इच्छा अजमावण्याचे केवळ एक साधन आहे. त्यात पावित्र्याचा काही प्रश्न नाही. याखेरीज, तितकीच कार्यक्षम असलेली इतरही साधने आहेत. गेल्या २० वर्षात ब्रिटिश सरकारने आपल्या बऱ्याच वसाहती-कडे सत्ता सोपवली परन्तु, सार्वमत घेऊन या वसाहतीमधील लोकांची इच्छा अजमावून घेण्याचा त्याने कधी विचार केला नाही. भारतीय उपखंडातील लोकांना स्वातंत्र्य हवे आहे की नको, व बहुसंख्य मुसलमानाना फाळणी हवी आहे की नको, हे अजमावण्यासाठी, भारतात सार्वमत घेण्यात आले नाही. स्वातंत्र्य दिले पाहिजे व देशाची फाळणी केली पाहिजे (कारण या दोन मुद्यांच्या बाबतीत एकीकडे भारतीय राष्ट्रीय कॉंग्रेस व दुसरीकडे मुस्लीम लीग लोकांच्या इच्छा व्यक्त करतात, अशी ब्रिटिश सरकारची खात्री पटली होती) असा निष्कर्ष ब्रिटिश सरकारने काढला. जम्मू व काश्मीरमध्ये एक पक्ष या नावाने नॅशनल कॉन्फरंस, हा राज्यातील बहुसख्य लोकांचे प्रतिनिधित्व करीत होता व मी अगोदरच सांगितल्याप्रमाणे, जम्मू व काश्मीर भारतात सामील होण्याला, त्याचा पूर्ण पाठिंबा होता.

१३ ऑगस्ट, १९४८ चा ठराव व ५ जानेवारी, १९४९ चा ठराव हे सुरक्षितता मंडळाचे दोन ठराव आम्ही मान्य केले. या ठरावांप्रमाणे, एक

पाठोपाठ एक असे अनेक उपाय योजले जायचे होते. सार्वमतासंबंधीचा ठराव (५ जानेवारी १९४९ चा) साहाय्यकारक व पूरक होता. व १३ ऑगस्ट, १९४८ च्या ठरावाचा तिसरा भाग अमलात आणायची वेळ आल्यास या भागाचा सविस्तर खुलासा करणारा होता. तो वास्तुशास्त्रज्ञाच्या आराखड्यासारखा होता व १३ ऑगस्ट, १९४८ चा ठराव पूर्णपणे अंमलात आणला तरच, ५ जानेवारी, १९४९ चा ठराव अमलात आणायचा प्रश्न उद्‌भवतो.

## काश्मीरमधील तीन सार्वत्रिक निवडणुका

सार्वमत घेण्याची शक्यता व्यक्त करण्यात आली कारण त्या वेळी काश्मीर-मध्ये, एकही सार्वत्रिक निवडणूक झाली नव्हती. त्यानंतर प्रौढ मतदान पध्दतीवर आधारलेल्या तीन सार्वत्रिक निवडणुका काश्मीरमध्ये झाल्या व या तिन्ही निवडणुकीमध्ये, जो पक्ष, काश्मीरच्या भारतातील सामीलीकरणाला ठामपणे पाठिंबा देतो तो पक्ष विजयी झाला. १९६२ साली झालेली निवडणूक भारतीय निवडणूक कायद्यानुसार झाली व भारतीय निवडणूक मंडळाच्या देखरेखीखाली ती झाली. या निवडणुकीत फसवेगिरी करण्यात आली किंवा त्या अनिर्बन्धपणे व गुप्त मतदान पध्दतीनुसार करण्यात आल्या नाहीत, असे आमच्या कट्टर शत्रूंनी सुध्दा कधी म्हटले नाही. कोणता उमेदवार निवडून द्यायचा, हे मतपत्रिका पेटीने ठरवले. या निवडणुकी इतक्या अनिर्बन्ध होत्या की एका निवडणुकीत, एका राज्यात, भारतातील बहुसंख्यक पक्षाला, भारतीय राष्ट्रीय कॉंग्रेसला, विरोध करणारा एक पक्ष विजयी झाला म्हणून काश्मीरमधील लोकांची इच्छा अजमावून घेणं जर आवश्यकच होते तर, ते एकदा नाही, दोनदा नाही, तीन वेळा अजमावून घेण्यात आले हे लक्षात ठेवले पाहिजे काश्मीरमधील निवडणुकीच्या स्वरूपासंबंधी, निरनिराळ्या वर्तमानपत्रामधील उतारे उद्‌धृत करून पाकिस्तानच्या परराष्ट्रमंत्र्यांनी, त्यांचा बराच उपयोग करून घेतला आहे. त्यांनी जी वर्तमानपत्रे निवडली आहेत, त्यापैकी एका वर्तमानपत्रातील मजकूर मी येथे उद्‌धृत करतो. हे वर्तमानपत्र म्हणजे 'मँचेस्टर गार्डियन.'

"जम्मूच्या निवडणुकीत, नॅशनल कॉन्फरन्सचा, प्रचंड व खराखुरा विजय झाला. काश्मीरमधील निवडणुकी संपल्या आहेत. जम्मूमध्ये, नॅशनल कॉन्फरन्स व हिंदू प्रजा परिषद, यांची चुरशीची टक्कर झाली व ५ सोडीज बाकीच्या सर्व जागा लढवण्यात आल्या. या निवडणुकीतील प्रचार व उत्साह, भारताच्या अत्यन्त प्रगत भागांतील प्रचाराच्या व उत्साहाच्या तोडीचा होता. *व या निवडणुकीत, नॅशनल कॉन्फरन्सने दोन तृतीयांश जागा जिंकल्या."* १९६२ मधील निवडणुकीत, ३२ उमेदवार अविरोध निवडून आले असे पाकिस्तानच्या परराष्ट्र मंत्र्यांनी म्हटले आहे. परंतु, ज्या इतर ३९ जागांसाठी चुरशीचा सामना झाला त्यांचा मात्र त्यांनी उल्लेख केला नाही.

जम्मू व काश्मीरमध्ये सार्वमत घेण्याचे तुणतुणे पाकिस्तान सारखे वाजवीत आहे, ते, त्याची लोकशाहीवर श्रध्दा आहे म्हणून नव्हे. कोणत्याही चांगल्या गोष्टीप्रमाणे, लोकशाहीची सुरुवात देखील स्वतःपासूनच करायला हवी, व आमच्या देशाच्या एका भागामधील लोकांच्या इच्छा आम्ही कशा प्रकारे समजावून घ्यावयात, यासंबंधी आम्हाला उपदेश करण्यापूर्वी, पाकिस्तानने प्रथम, आपल्याच देशात, लोकशाही संस्था स्थापन करण्याच्या कार्याला निदान सुरुवात करायला पाहिजे. पाकिस्तान अस्तित्वात आल्यापासून कायदे-मंडळे व पार्लमेंट या संस्था स्थापन करण्यासाठी तेथील लोकांना, प्रत्यक्ष व सार्वत्रिक निवडणुकीत भाग घेऊ देण्याइतका सुध्दा विश्वास त्याने तेथील लोकांवर कधीही व्यक्त केला नाही, हे मी सांगायला हवे असे नाही.

पाकिस्तानमधील लोक अशा लोकशाही हक्काचा उपभोग घ्यायला लायक नाहीत, असे त्यांच्या अध्यक्षांनी वेळोवेळी म्हटल्याचे व आज स्वातंत्र्य मिळाल्यानंतर १७ वर्षे लोटली असताना, पाकिस्तानच्या लोकांना अजूनही मूलभूत लोकशाहीचे धडे दिले जात असल्याचे पाकिस्तानच्या परराष्ट्र मंत्र्यांना माहीतच आहे ही मूलभूत लोकशाही, हा लोकशाहीचा अत्यंत मिळमिळीत व सौम्य प्रकार आहे हे सांगायला नको. त्यांच्या धर्मावर संकट आले आहे, असे काश्मीरमधील लोकांच्या मनात भरवून देऊन, जातीय भावना प्रक्षुब्ध होतात की नाही हे पाहायचे व त्या दृष्टीने प्रयत्न करायचा आणि १९४७ मध्ये भारताची फाळणी

झाल्यानंतर रक्तपात, लोकांचे स्थलांतर, अत्याचार, इत्यादि ज्या अत्यंत भयानक घटना घडल्या तशाच घटना पुन्हा घडवून आणायच्या, हे, सार्वमताचा आग्रह धरण्याचे खरे कारण आहे.

## पाकिस्तानने आपले आक्रमक सैनिक काढून घेणे हाच संयुक्त राष्ट्रांच्या ठरावांचा आधार.

थोडक्यात सांगायचे म्हणजे, जम्मू व काश्मीर विषयीची आमची भूमिका स्पष्ट व निःसंदिग्ध आहे. सार्वमतासंबंधीचे सुरक्षितता मंडळाचे दोन ठराव सशर्त होते व पाकिस्तानने आपले आक्रमक सैनिक काढून घेतल्यावर ते अमलात आणायचे होते. ही अट पाकिस्तानने अजून पूर्ण केली नाही. ही केवळ अट नाही तर या दोन्ही ठरावाचा तो आधार आहे. ती अट पाकिस्तानने पूर्ण न केल्यामुळे व ठरावांचा आधारच नष्ट झाल्यामुळे, हे ठराव आमच्यावर बंधनकारक नाहीत. ते काहीही असले तरी इतका काल लोटल्यामुळे व इतर अनेक बाबीमुळे. (त्याचा मी नंतर उल्लेख करीन) हे ठराव कुचकामी, टाकाऊ ठरले आहेत. त्याना आता काही किंमत राहिलेली नाही. काश्मीरमध्ये सार्वमत घेऊन, आमच्या देशाच्या अविभाज्यतेला व धर्मनिरपेक्षतेवरील आमच्या श्रध्देला जो धोका निर्माण होईल, त्याविषयी आम्ही शांत राहू शकत नाही माझ्या सरकारच्या वतीने मी हे स्पष्ट करू इच्छितो की काश्मीरमध्ये सार्वमत घेणे आम्ही कोणत्याही परिस्थितीत मान्य करू शकत नाही.

## पाकिस्तानचे विचित्र आक्षेप

काश्मीर भारतात, आणखी 'विलीन' करण्याचा माझ्या सरकारचा तथाकथित प्रयत्न चालू आहे, असा आरोप पाकिस्तानने केला आहे. त्याचे मी आता खंडन करतो. पहिली गोष्ट म्हणजे जम्मू व काश्मीर हा भारताचा अविभाज्य भाग आहे व भारतीय संघराज्याच्या एका घटक राज्याबरोबरचे आमचे संबंध व्यवस्थित करणे एवढेच काय ते आम्ही आज करीत आहोत.आमची ही कृती, अमेरिकेच्या ५० घटक संस्थानांपैकी एका संस्थाना-बरोबरच्या अमेरिकन कॉंग्रेसच्या व्यवहारासारखी आहे. म्हणून पाकिस्तानने उपस्थित केलेला प्रश्न

ही सर्वस्वी आमची अंतर्गत स्वरूपाची बाब असून, फक्त भारताचा तिच्याशी संबंध आहे. व तिच्या बाबतीत हस्तक्षेप किंवा मध्यस्थी करण्याचा पाकिस्तानला मुळीच हक्क नाही व संयुक्त राष्ट्रांच्या सनदेनुसार अंतर्गत बाब जागतिक संघटनेच्या अधिकारक्षेत्रातून स्पष्टपणे वगळण्यात आली आहे.

परन्तु तरी सुध्दा, आम्ही असे काय केले आहे की ज्यामुळे पाकिस्तान चिडला आहे व जे त्याने इतक्या तातडीने मंडळासमोर मांडले आहे हे आपण पाहू या! आमच्या घटनेच्या २१ व्या भागात, जम्मू व काश्मीर-संबंधीची कलमे आहेत या भागात, भारतीय संघराज्याच्या आंध्रप्रदेश, पंजाब व महाराष्ट्र इत्यादि इतर राज्यांसंबंधीची कलमेही आहेत. या तरतुदी केवळ तात्पुरत्या व मध्यंतरीच्या काळापुरत्या आहेत. त्या लागू करण्याची आवश्यकता जोपर्यंत भासेल तोपर्यंत त्या लागू केल्या जातील. त्यांची आवश्यकता राहिली नाही म्हणजे त्या वगळल्या जातील व घटनेतील ज्या तरतूदी सर्व राज्यांना लागू आहेत, त्या तरतुदी, या भागानुसार ज्या राज्यांच्या बाबतीत खास व्यवस्था करण्यात आली आहे अशा राज्यांनाही लागू होतील. घटनेच्या चौकटीबाहेर न जाता केंद्रीय सरकारच्या अधिकारात, सतत बदल करण्यात आले आहेत किंवा त्याची व्याप्ती वाढवण्यात आली आहे. त्यामुळे, केंद्रीय सरकार व घटक राज्ये यांच्यातील सम्बन्ध बदलत राहिले आहेत. हे बदल निरनिराळ्या वेळी घडत आले असून, भारतीय संघराज्याच्या पध्दतशीर विकासाच्या प्रक्रियेचा तो एक भाग आहे. आता जे बदल करायचा विचार आहे व ज्यांचा उल्लेख, पाकिस्तानच्या १६ जानेवारी, १९६४ च्या पत्रात केला आहे, ते, राज्यप्रमुख पदाचे नाव बदलून 'सदरे रियासत' ऐवजी 'राज्यपाल' करण्याचे व 'वजीरे आझम' ऐवजी 'मुख्य मंत्री' करण्याबद्दलचे आहेत. हा फक्त नामाभिधानातील बदल आहे.

पाकिस्तानने ज्या दुसऱ्या संकल्पाबद्दल तक्रार केली आहे, तो भारतीय संसदेतील जम्मू व काश्मीरचे प्रतिनिधी, सध्याच्या पध्दतीनुसार काश्मीर कायदेमंडळाच्या शिफारशीनुसार न नेमता, सरळ काश्मीरमधील लोकांनीच निवडून देण्यासंबंधीचा आहे. असे करण्यात काय गैर आहे ? पाकिस्तानला

रस्ते, तारा, टेलिफोन, प्राप्तीकर, ध्वनिक्षेपण व जकात यांची जबाबदारी स्वतःकडे घेणे, काश्मीरच्या हिशोब व हिशोबतपासणी खात्याला गौण स्थान देऊन ते भारताच्या ऑडीटर-जनरलच्या अधिकाराखाली आणणे, राज्यात जाण्यासाठी किंवा राज्यातून बाहेर जाण्यासाठी असलेली परवाना पद्धत व जकातविषयक निर्बंध रद्द करणे, काश्मीरच्या आर्थिक योजना नियोजन मंडळाच्या अधिकाराखाली आणणे, सर्वश्रेष्ठ न्यायालयाचे (सुप्रीम कोर्ट) अधिकारक्षेत्र, काश्मीरला लागू करणे व हुकुमनामे काढून, जम्मू व काश्मीर-मध्ये, कायदे अंमलात आणण्याचा अधिकार भारताच्या राष्ट्रपतीने स्वतःकडे घेणे, इत्यादि, काश्मीरचे अधिक विलीनीकरण' घडवून आणणाऱ्या उपायां-चाही पाकिस्तानच्या परराष्ट्रमंत्र्यांनी उल्लेख केला आहे. व पाकिस्तानच्या परराष्ट्र मंत्र्यांचे शब्द पुन्हा उद्धृत करायचे म्हणजे 'काश्मीरला बंधनांनी जखडून टाकणाऱ्या शृंखलेतील हे दुवे आहेत.' काश्मीरमध्ये आम्ही जे काही केले आहे, त्याचा विपर्यास जर काही असेल तर तो हाच आहे. पाकिस्तानचे आक्रमण चालू असताना, आम्ही हात जोडून स्वस्थ बसू आणि काश्मीरमधील लोकांची स्थिती सुधारण्यासाठी जे काही करता येणे शक्य आहे ते आम्ही करणार नाही, असे पाकिस्तानला वाटते काय ? आम्ही जे जे केले आहे व ज्या उपायांचा, पाकिस्तानने उल्लेख केला आहे, ते सर्व काश्मीरमधील लोकांची स्थिती सुधारण्यासाठी व या राज्याला आधुनिक करण्यासाठी योजले आहेत. पाकिस्तानने म्हटले आहे, "काश्मीरच्या हिशोब व हिशोबतपासणी खात्याला गौण स्थान देऊन ते भारताच्या ऑडीटर-जनरलच्या अधिकाराखाली आणण्यात आले आहे." एखाद्या राज्याचे हिशोब भारताच्या ऑडीटर-जनरलसारख्या स्वतंत्र अधिकाऱ्याकडून, योग्य रीतीने तपासून घेणे, यात काय गैर आहे ? काश्मीरमधील महसूल अधिकाऱ्यांनी लोकांच्या पैशाची उधळपट्टी करावी अशी पाकिस्तानची इच्छा काय आहे ? जकातविषयक निर्बंध व परवाना पद्धत रद्द केल्याने, व्यापाराला मदत होईल व काश्मीर आणि भारताचा उरलेला भाग यांच्यातील मालाच्या वाहतुकीला आज जो विलंब लागतो तो लागणार नाही,

केसाच्या चोरीचा, निराधार व खोडसाळ संबंध जोडणाऱ्या पाकिस्तानच्या १६ जानेवारी १९६४ च्या पत्राकडे मी आता वळतो भारताच्या धोरणामुळे, काश्मीरमधील लोकांत, जो तीव्र असंतोष निर्माण झालेला आहे व वाढतो आहे त्याचा आणि जम्मू व काश्मीर भारतीय संघराज्यात 'विलीन' करण्याचे भारताने अलीकडेच जे प्रयत्न केले त्यांच्यामुळे, तेथील लोकांना जी चीड आली आहे तिचा, या पवित्र अवशेषाच्या चोरीमुळे भडका उडाला आहे आणि ही चोरी झाल्यापासून जम्मू व काश्मीरमधील मुसलमानांनी दहा पेक्षा जास्त दिवस प्रचंड निदर्शने करून, व श्रीनगरमधील रस्त्यातून, हजारो मुसलमानांनी, शोक-प्रदर्शक मिरवणुका काढून, आपला संताप व्यक्त केला आहे, असे सांगण्यात आले आहे निदर्शन, जम्मू व काश्मीरच्या मुसलमानांनी केले, त्यात इतर कोणी सामील झाले नाहीत, असे येथे सांगण्यात आले आहे हे तुम्ही लक्षात घ्या. म्हणजे, काश्मीरमधील घटनांना, जातीय वळाटणी देण्याचा पाकिस्तानने कसा प्रयत्न केला आहे, ते तुमच्या ध्यानात येईल. पाकिस्तानला, कोणतीही घटना जातीयच वाटते. त्याने जातीयतेचा चष्मा लाव आहे. त्यामुळे त्याला जातीयतेखेरीज दुसरे काहीच दिसत नाही. काश्मीरमध्ये, हिंदू व मुसलमान, शांततेने कसे राहू शकतात व त्यांचे संबंध अत्यंत चांगले कसे असू शकतात, हे तो समजूच शकत नाही. मुसलमान हिंदूंचा द्वेष करणारच व हिंदू मुसलमानांचा द्वेष करणारच, हेच स्वाभाविक आहे, असे पाकिस्तानचे तत्त्वज्ञान आहे.

जेंव्हा पवित्र केस चोरण्यात आला तेंव्हा काश्मीरमध्ये जातीय दंगे होतील असे पाकिस्तानला वाटले. त्याची ही केवळ अपेक्षा नव्हती तर जातीय दंगे भडकावण्याचा त्याने पराकाष्ठेचा प्रयत्न सुद्धा केला. पाकिस्तानातील जबाब-दार पुढाऱ्यांची वर्तमानपत्रात प्रसिध्द झालेली निवेदने व त्यांची वक्तव्ये, यावरून ही गोष्ट स्पष्ट होईल. सक्कर येथे ४ जानेवारी, १९६४ रोजी, अध्यक्ष अयूबखान यांनी सांगितले,:

"पवित्र अवशेषाची चोरी हा व्याप्त काश्मीरमधील मुसलमानावर अधिकाधिक अत्याचार करण्यासाठी, बुध्दिपुरस्सर रचलेला एक राजकीय कट

आहे. कोणत्याही मुसलमान व्यक्तीच्या मनाला, मग ती कितीही दुराचरणी असो, अशी पवित्र वस्तूची चोरी करण्याचा विचार सुध्दा शिवणार नाही. म्हणून या अघोर गुन्ह्याबद्दल कोणत्याही मुसलमान व्यक्तीला, जबाबदार धरता येणार नाही, ही गोष्ट निर्विवाद आहे आणि ह्या गुन्ह्याच्या मुळाशी राजकीय कट होता, हे स्पष्ट आहे."

ही चोरी एखाद्या हिंदूनेच केली असली पाहिजे हे या निवेदनात सूचित केले असून त्यामुळे पाकिस्तानने काश्मीरमधील मुसलमानाची मने, हिंदूविरुध्द प्रक्षुब्ध केली आहेत हे तुमच्या सहज लक्षात येईल.

आता मी स्टॉकहोमच्या एका प्रसिध्द वर्तमानपत्रातील उतारा उद्धृत करतो. 'स्वेन्स्क डॅगब्लॅट' या वर्तमानपत्राच्या ३० डिसेंबरच्या अंकातील मजकूर असा—"हिंदूमध्ये धर्मवेडे लोक असले, व ते असणारच तरी सुध्दा, महमदाच्या पवित्र केसाच्या ज्या चोरीमुळें काश्मीर-मध्ये दंगे उसळले, तिच्या मुळाशी हिंदू होते, यावर विश्वास ठेवणे कठीण आहे. हें कृत्य पाकिस्तानच्या कोणत्या तरी हस्तकाचें असण्याची बहुधा भारताकडील भागात, 'अल्जीरियन विमोचन युध्द' घडवून आणून त्यात भाग घेण्यासाठी गेल्या काही वर्षांत पाकिस्तानकडील भागात भरती करण्यात आलेल्या पठाणांपैकी एखाद्याचे असण्याची अधिक शक्यता आहे"....अशा प्रकारे, चीनला जे हवे आहे तेही घडून येईल. लदाखविषयीची भारताची संरक्षण-व्यवस्था, संपूर्णपणे, श्रीनगर व खोरे यानां जोडणाऱ्या रस्त्यावर अवलंबून आहे लदाखहून निघणारा एकमेव रस्ता सरळ श्रीनगरला जातो म्हणून लष्करीदृष्ट्या त्याला फार महत्त्व आहे."

रिचर्ड क्रिचफील्ड यांनी पाठवलेल्या बातमीपत्रातील उतारा उद्धृत करताना, पाकिस्तानचें परराष्ट्र मंत्री श्री० भुट्टो यांनी सोयीस्करपणे त्यातील महत्त्वाचा भाग वगळला. श्री० भुट्टो यांनी बातमीपत्रातील जो भाग उद्धृत केला आहे त्याचा पुढील भाग असा आहे :—"तिकडे पाकिस्तान-मध्ये, परराष्ट्रमंत्री श्री० भुट्टो यानी काश्मीरी लोकाना, भारतीय नियंत्रण असलेल्या सरकारविरुध्द बंड पुकारण्याचे आवाहन केले आहे."

आणि बंद पुकारण्याचे आवाहन करणारे हेच परराष्ट्र मंत्री येथे शांतता स्थापन करण्याची विनंती करण्यासाठी आले आहेत ! मी पुन्हा सांगतो, "परराष्ट्रमंत्री श्री० भुट्टो यांनी काश्मीरी लोकांना भारतीयांचे नियंत्रण असलेल्या सरकारविरुध्द बंड पुकारण्याचे आवाहन केले."

त्यांचे हे जे निवेदन उद्धृत केले आहे ते बरोबर आहे, हे पाकिस्तानचे परराष्ट्रमंत्री मान्य करतील काय ?

इकॉनॉमिस्ट'च्या ४ जानेवारी, १९६४ च्या अंकातील मजकूरही श्री० भुट्टो यांनी उद्धृत केला आहे तो असा :—

"पाकिस्तानचे परराष्ट्रमंत्री श्री० भुट्टो यांनी या चोरीच्या प्रकरणात भारत व्याप्त प्रदेशातील अधिका-यांचा हात होता असा आरोप केला आहे. "गांजलेल्या" मुसलमान लोकांना दहशत बसावी व त्यांनी आपले घरदार सोडून पळून जावे म्हणून त्यांनी हा आरोप केला, हे उघड आहे अगदी सौम्य शब्द वापरायचे म्हणजे या आरोपावर विश्वास सुध्दा ठेवता येत नाही. परंतु तो अविश्वसनीय आहे, हा मुद्दा नाही तर असा आरोप करण्यात आला आहे, हा मुख्य मुद्दा आहे."

तेव्हा ही चोरी, गांजलेल्या मुसलमानांवर दहशत बसवण्याच्या हेतूने करण्यात आली, हा आरोप करताना 'इकॉनॉमिस्ट'ने श्री० भुट्टो यांच्या मुद्याची दखल घेतली. काश्मीरमध्ये दंगे व्हावे, काश्मीरच्या लोकांच्या विशेषतः मुसलमानांच्या भावना प्रक्षुब्ध करण्यात याव्यात आणि त्यांनी हिंदूंच्या विरुध्द उठावणी करावी, हे त्यात सूचित होते.

पवित्र केसाच्या चोरीचा निषेध म्हणून काश्मीरमधील लोकांनी निदर्शने केली त्या वेळी पाकिस्तानच्या दुर्दैवाने, पूर्ण जातीय सलोखा होता. ही *सत्यस्थिती आहे व तिला आक्षेप घेता येणार नाही. निदर्शनात मुसलमानां*-बरोबर हिंदू व शीख हेही सामील झाले व त्यानीही दुःख व्यक्त केले. हिंदू व शीख याच्या दृष्टीने तो केवळ मुसलमानी धर्माचा अवशेष नव्हता तर काश्मीरमधील, नव्हे संपूर्ण भारतातील अवशेष होता. भारतातील लोकं

परस्परांच्या धर्मांविषयी आदर बाळगतात. हिंदू लोक मुसलमान सत्पुरुषांविषयी व मुसलमान लोक हिंदू साधूसंतांविषयी आदर बाळगतात. निरनिराळ्या जमातींचे जे उत्सव होतात त्यात आम्ही सर्वजण सामील होतो. हे सर्व समजण्यासाठी आधुनिक, धर्मनिरपेक्ष, पुरोगामी व बुद्धिनिष्ठ दृष्टिकोन आवश्यक आहे.

ही निदर्शने, भारत सरकारविरुद्ध करण्यात आली नव्हती. उलट, त्यांच्यावरून, माझ्या सरकारच्या धोरणावर लोकांचा संपूर्ण विश्वास आहे हे स्पष्ट झाले व याहीपेक्षा महत्त्वाची गोष्ट म्हणजे निदर्शनात भाग घेतलेल्या लोकांनी, स्थानिक प्रशासन व्यवस्थेऐवजी केंद्र सरकारने या प्रकरणाची चौकशी करावी व अपराध्याला शिक्षा करावी, अशी केंद्र सरकारला विनंती केली. काश्मीरमधील लोकांच्या या विनंतीला मान देऊन, भारत सरकारने आपले सर्वोच्च अधिकारी, चौकशी करण्यासाठी व अवशेष मिळवण्यासाठी श्रीनगरला पाठवले. माझ्या सरकारचा उपाय यशस्वी झाला. कारण तो अवशेष सापडला व तो पुन्हा मशीदीत ठेवण्यात आला. ४ फेब्रुवारी १९६४ च्या न्यूयॉर्क टाइम्सच्या अंकात श्रीनगरच्या ३ फेब्रुवारीच्या बातमीत जो मजकूर होता तो असा:—

"येथून जवळच असलेल्या एका मशीदीत जो केस आता ठेवण्यात आला आहे तो, गेल्या २६ डिसेंबर रोजी नाहीसा झालेलाच केस आहे असे मुसलमान पुढाऱ्यांच्या एका समितीने आज ठरवले."

मला मिळालेल्या ताज्या माहितीनुसार, हजरतबल येथे, ६ फेब्रुवारी रोजी, एक खास 'दीदार' ( दर्शन ) भरवण्यात आला. अनेक प्रमुख धार्मिक व्यक्तींनी ( यातील बहुतेक, कृती समितीने नियुक्त केलेल्या व पाकिस्तानी परराष्ट्रमंत्र्यांनी उल्लेख केलेल्या होत्या ) तो पवित्र केस पाहिला व तो खरा असल्याचे, मशीदीत जमलेल्या प्रचंड जनसमुदायाला सांगितले. ज्यांनी तो केस ओळखला त्यातील एक, मौलाना मसूदी हे असून, त्यांचाही पाकिस्तानच्या परराष्ट्रमंत्र्यांनी उल्लेख केला आहे. चौकशीचे काम आता संपत

आले असून, अपराध्यांवर लोकरच खटले भरले जातील. ही निदर्शने, स्थानि प्रशासन व्यवस्थेविरुध्द होती हे खरे आहे. परतु, आपल्या सरकारविषय स्वतःला वाटत असलेले असमाधान व्यक्त करणे, हा लोकशाहीमध्ये लोकांचा निःसंशय एक हक्क आहे. अधिक पुढारलेल्या समाजात सुध अशा प्रकारची निदर्शने झालेली आहेत.

सरकारवर आपला विश्वास नाही, केवळ एवढेच दाखवण्याचा नव्हे त सरकारला खाली ओढून नवे सरकार निवडण्याचाही लोकशाही देशामधी लोकांना हक्क आहे. व तो त्यांच्याजवळून हिरावून घेता येणार नाही.

श्रीनगरमधील निदर्शनांच्या स्वरूपासंबंधी मी जे काही सांगत आहे, किती बरोबर आहे हे त्या वेळी तेथे जातीने उपस्थित असलेल्या व ती निदर्श स्वतःच्या डोळयांनी पाहिलेल्या परदेशी वातमीदाराच्या वातमीपत्रावरून पुरे सिध्द होते.

'गार्डियन' या सुप्रसिध्द इग्रजी वर्तमानपत्रातील मजकूर श्री० भुट्ट यांनी उद्धृत केला. ६ जानेवारी, १९६४ च्या या पत्राच्या अकातील मजकू असा आहे—

"पवित्र अवशेष सापडला आहे असे सरकारने जाहीर केल्यानंतर काल श्रीनगरमधील लोक रस्त्यातून नाचत व गात-गात चालले होते. एका प्रक्षुब्ध शहराचे रूपांतर, एकाएकी एका आनंदी शहरात झाले."

न्यूयॉर्क टाइम्सच्या २४ जानेवारी १९६४ च्या अकात, टॉमस ब्रॅडी यांनी पाठवलेल्या वातमीपत्रातील उतारा असा आहे :—

"काश्मीरी लोकाना, भारताच्या राष्ट्रीय सरकारविषयी वाटणारा नव्हे तर स्थानिक सरकारविषयी वाटणारा असंतोष, पवित्र अवशेषाच्या चोरी-नंतर झालेल्या निषेध मोर्चात व दंग्यात व्यक्त झाला. तेथील बहुसंख्य मुसलमान लोकांनी अल्पसंख्य हिंदु लोकाविषयी द्वेष व्यक्त केला नाही. पवित्र अवशेष नाहीसा झाल्यानंतर लुटालूट करण्याचे व आग लावण्याचे जे प्रकार घडले त्यात, राज्याचे माजी पतप्रधान बक्षी गुलाम महमद आणि त्यांचे बंधू

व राजकारणातील त्याचे उजवे हात दक्षी रशीद, यांच्या व्यापारी पेढ्या, दुकाने व केंद्रे यांच्यावरच लोकांचा डोळा होता, असे दिसून येते. हे दोघेही मुसलमान आहेत."

बक्षी गुलाम महमद किंवा त्यांचे बंधू यांचा बचाव करण्यासाठी मी येथे आलो नाही. या उताऱ्यातील मुद्दा असा आहे की ही निदर्शने स्थानिक प्रशासन व्यवस्थेविरुध्द होती, ती भारत सरकारविरुध्द नव्हती.

५ जानेवारी, १९६४ च्या न्यूयॉर्क टाइम्सच्या अंकातील मजकूर असा आहे—"भारताच्या बाजूने असलेल्या काश्मीर सरकारला बदनाम करण्यासाठी, पाकिस्तानविषयी सहानुभूती वाटत असलेल्या लोकांनी पवित्र केस चोरला, असे एक मत येथे व्यक्त केले जात आहे."

८ जानेवारीच्या 'हिंदुस्थान टाइम्समध्ये' एका भारतीय समीक्षकाने व्यक्त केलेली मते परराष्ट्र मंत्र्यांनी उद्धृत केली आहेत. हा समीक्षक बक्षी गुलाम महमद यांच्या किंवा आज अधिकारारूढ असलेल्या सरकारच्या सुध्दा बाजूचा नाही हे उघड आहे. वर्तमानपत्रांना संपूर्ण स्वातंत्र्य असलेल्या एका स्वतंत्र देशात, प्रत्येकाला आपले मत व्यक्त करण्याचा पूर्ण अधिकार आहे. परंतु या समीक्षकाचे सगळे विचार प्रामाणिकपणे माहीत करुन घेण्यासाठी, श्री० भुट्टो यांनी त्याच लेखातील जे दोन परिच्छेद वगळले ते मला वाचून दाखवलेच पाहिजेत. ते परिच्छेद त्यांनी का वगळले याची कारणे उघड आहेत.

"काश्मीरमधील लोकांना वाटत असलेली भीती आणि त्यांचा प्रक्षोभ, जातीयतेत किंवा भारत विरोधी भावनांत व्यक्त झाला नाही, हे सत्य लक्षात घ्यायलाच हवे. मार्गदर्शनासाठी व नेतृत्वासाठी लोक, पाकिस्तानविषयी सहानुभूती वाटत असलेल्या लोकाकडे वळले नाहीत. पवित्र अवशेषाच्या चोरीची चौकशी खुद्द भारताने करावी, अपराध्यांना शिक्षा करावी व काश्मीरमध्ये पुन्हा बक्षी राजवट सुरु होणार नाही, अशी खबरदारी घेण्यात यावी, अशी त्याची मागणी होती.

"काश्मीरमधील लोकांनी आपला कौल स्पष्टपणे दिला आहे व आपल्या गरजा व आकांक्षा, यांची परिपूर्ती करणारी एक चांगली व कार्यक्षम प्रशासन-

व्यवस्था स्थापन होण्यासाठी, जुन्या राजवटीवर आपण जबरदस्त प्रहार केला आहे, अशी आशा ते करू शकतात. आपल्या हिताची व आपल्याला न्याय्य वाटत असलेली गोष्ट भारत करील असा विश्वास त्यांनी व्यक्त केला. त्यांचा पुन्हा विश्वासघात करणे आम्हाला परवडेल का ?" काश्मीरी लोकांचा भारतावर विश्वास आहे भारताने हस्तक्षेप करावा अशी त्यांची इच्छा आहे व स्थानिक प्रशासनव्यवस्थेविषयी ते संतुष्ट नाहीत, याच मुद्यावर या उताऱ्यांमध्ये भर देण्यात आला आहे

काश्मीरमध्ये उपद्रव सुरू करण्याचा त्यांचा दुष्ट डाव फसल्यानंतर, पाकिस्तानने पूर्व पाकिस्तानकडे आपले लक्ष वळविले. आणि खुलना व जेसोरमध्ये भीषण दंगे होऊन तेथील अल्पसंख्य हिंदूंवर हल्ले करण्यात आले. लुटालुटीचे, आग लावण्याचे व भोसकण्याचे भयानक प्रकार घडले. भयभीत झालेल्या अल्पसंख्य जमातीचे बरेच लोक, पायी चालत, जवळच असलेल्या भारतीय प्रदेशाकडे यायला निघाले. खुद्द काश्मीरमध्ये, बहुसंख्य मुसलमान लोकांना पवित्र अवशेषाच्या चोरीच्या प्रकरणात हिंदूंचा हात आहे, असा संशय आला नाही परंतु तेथून दीड हजार मैल दूर असलेल्या पूर्व पाकिस्तान मधील मुसलमान मात्र तेथील हिंदूं विरुध्द निदर्शने करीत होते व काश्मीरमधील हिंदू लोकांवर मुसलमान विरोधी कृत्ये केल्याचा आरोप करीत होते, ही गोष्ट चमत्कारिक नाही का ?

## पूर्व पाकिस्तानातील दंगे—परकीयांची मते

१९ जानेवारी, १९६४ च्या 'न्यूयॉर्क टाइम्स' च्या अंकातील, नेवार्ड यांच्या बातमीपत्रातील उतारा मी वाचून दाखवीत आहे:—

"महमदाच्या पवित्र केसाची तीन आठवड्यापूर्वी जी चोरी झाली तिच्यामुळे, पूर्व पाकिस्तानात दंगे झाले, असे जे सरकारकडून सांगितले जाते, त्यावर येथील (म्हणजे पूर्व पाकिस्तानातील—जेथे दंगे झाले तेथील) फारच थोडे लोक विश्वास ठेवतात.

"पवित्र अवशेषाच्या चोरीचा निषेध करण्यासाठी सरकारी मंजुरी मिळालेल्या पूर्व पाकिस्तानच्या खुलना व जेसोर जिल्ह्यांमधील मिरवणुकीतील लोक बेफाम झाले व त्यामुळे हिंदूविरुद्ध दंगे झाले." 'सरकारी मंजुरी मिळालेल्या' हे शब्द मडळाने लक्षात घ्यावे, अशी माझी विनंती आहे.

खुलनामधील दंग्यांची प्रतिक्रिया होऊन कलकत्त्यामध्ये दगे झाले. आपल्या धर्मबांधवांची काय दशा करण्यात आली याची माहिती पूर्व पाकिस्तानातून आलेल्या निर्वासितांनी दिली. कलकत्त्यामधील हिंदूंच्या भावना प्रक्षुब्ध झाल्यावर दुर्दैवी प्रकार घडून मुसलमानांची जीवित हानी झाली व मुसलमानांची काही घरे जाळून टाकण्यात आली.

## कलकत्त्यामधील दंगे, त्यांचे कारण व योजलेले उपाय

## श्री० चागला यांनी स्वतःच्या डोळ्यांनी पाहिलेली वस्तुस्थिती

योगायोग असा की हे दंगे होत असताना माझा मुक्काम कलकत्त्याला चार दिवस होता. शिक्षण मंत्री या नात्याने सरकारी कामानिमित्त मी तेथे गेलो होतो. परंतु या दंग्यांचा बंदोबस्त करण्यासाठी पश्चिम बंगाल सरकारने जे उपाय योजले ते मी स्वतः माझ्या डोळ्यांनी पाहिले आहेत. पश्चिम बंगालच्या मुख्य मंत्र्यानी जे कडक उपाय योजले त्यांची मी प्रशंसा करतो. त्यांनी तावडतोब सैनिक बोलावले व संपूर्ण शहरात कर्फ्यू अंमल जारी करण्यात आला. आमचे गृहमंत्री श्री नंदा हे सुध्दा कलकत्त्याला गेले व आणखी उपाय योजण्यात आले. सुमारे ५ हजार गुंडांना पकडण्यात आले. शांतता व सुव्यवस्था स्थापन करण्याच्या कामी हातभार लावण्यासाठी नागरिकांची समिती स्थापन करण्यात आली आणि मुसलमानांची घरे पाडली जाण्याचा कोणत्याही जमीन मालकाला गैर फायदा घेऊ दिला जाणार नाही व मुसलमानांना ते पूर्वी जेथे राहात होते, त्याच वस्तीत शक्यतोवर स्थायिक केले जाईल, असे आश्वासन देण्यात आले. पश्चिम बंगालच्या राज्यपाल कुमारी पद्मजा नायडू यांच्या सरकारी निवासस्थानी, राजभवनात मी राहात होतो, त्यांनी राज-

भवनाचा बराच मोठा भाग, निराधार झालेल्या मुसलमानांना आसरा देण्या साठी मोकळा करून दिला. कलकत्त्यामधील दग्यांचा खबीरपणे कडक उपाय योजून बंदोबस्त करण्यात आला. आज तेथे पूर्ण शांतता असू परिस्थिती पूर्ववत झाली आहे परंतु. जातीय दंगांची ही भयंकर कहाणी येथ संपत नाही. त्यानंतर, ढाक्का, नारायणगंज, चितगाँग, धारिसाल या शहरात (ही सर्व शहरे पूर्व पाकिस्तानात आहेत) व पूर्व पाकिस्तानच्या बऱ्याच जिल्ह्यांमध्ये, दंगे झाले, रक्तपात व लुटालूट याचे भयानक प्रकार घडले व रॉयटरसारख्या महत्वपूर्ण वृत्तसंस्थेच्या बातमीनुसार सुध्दा, सुमारे १ हजार हिंदूंची कत्तल करण्यात आली. आमच्या माहितीप्रमाणे, संपूर्ण पूर्व पाकिस्तानात, ठार झालेल्या हिंदूंची संख्या पुष्कळ जास्त असून. अजून उपद्रव थांबलेला नाही व तेढ अजूनही कायम आहे. ढाक्क्यामधील भारताच्या डेप्युटी हायकमिशनरकडे आतापर्यन्त, ५० हजारापेक्षा जास्त कुटुंबांनी, (२ लाखांपेक्षां जास्त लोकांनी) स्थलांतर करून, भारतात यायची परवानगी मिळावी अशी विनंती केली आहे. आसाममधील केवळ एका जिल्ह्यात (गारो हिल्स) पूर्व पाकिस्तानातून सुमारे २० हजार निर्वासित आले आहेत.

हे सर्व सरकारी आकडे आहेत. हे आकडे उद्धृत करण्याची माझी इच्छा नव्हती. ते फार भयानक व दुःखदायक आहेत. परंतु पाकिस्तानच्या परराष्ट्र मंत्र्यांना मंडळापुढे एकांगी चित्र रेखाटणारे निवेदन केल्यामुळे, मंडळासमोर संपूर्ण चित्र उभे करण्याची मला आवश्यकता भासली.

पूर्व पाकिस्तानात काहीहि होवो, निरपराधी लोकांची हत्या करणाऱ्या गुन्हेगारांवर आम्ही दयामाया दाखवीत नाही, हे मला स्पष्ट करावेसे वाटते. एका मुसलमानाचा जीव, आम्हाला एका हिंदूच्या जीवाइतकाच मोलाचा आहे. कारण हिंदु व मुसलमान हे दोघेही, भारतीय नागरिक आहेत. रक्तपात, लुटालूट व आग लावणे, यांचा आम्ही धिःकार करतो. मग हे प्रकार घडण्याचे कारण कितीही प्रक्षोभक असो व ते कोठेही होवोत. प्रत्येक मानवाविषयी आम्हाला आदर वाटतो व जातीयता किंवा धर्मांधता आम्हाला घृणास्पद वाटतात.

## सलोखा स्थापन करण्याची पंतप्रधानांनी केलेली विनंती

२३ जानेवारी, १९६४ रोजी, आमच्याप्र पंतप्रधानांनी, ते आजारी असताना सुध्दा, अंथरूणावरून, देशाला उद्देशून जो विनंती केली, ती अशी:—

"गेल्या काही दिवसात, पूर्व पाकिस्तानात अनेक निरपराधी स्त्री पुरुषांची व मुलांची हत्या झाल्याचे ऐकून आम्हाला अत्यंत दुःख झाले. या घटनामुळे आम्हाला धक्का बसला असून आम्ही अस्वस्थ झालो आहोत. आपले देशबांधव, शांत राहतील व या घटनांनी ते प्रक्षुब्ध होणार नाहीत, अशी मला आशा वाटते. आपली थोर पुरातन परंपरा, आपल्याला सहिष्णुता दाखवायला व संयम राखायला शिकवते. इतरत्र काहीहि होवो, भारतातील नागरिकांनी, या थोर परंपरेचे आपण खरेखुरे वारस आहोत हे सिध्द केले पाहिजे व आपल्या बरोबर राहात असलेल्या इतर नागरिकांचा धर्म कोणताही असो त्याच्याशी सलोख्याने व सद्भावनेने राहण्याचे आपले पवित्र कर्तव्य पार पाडले पाहिजे. केवळ अशा आचरणानेच, आपले थोर नेते गांधीजी यानी आपल्यावर व्यक्त केलेल्या विश्वासाला आणि स्वातंत्र्य, लोकशाही व धर्मनिरपेक्ष राज्य निर्माण करण्याचे ध्येय साध्य करायला आपण पात्र आहोत असे सिध्द होईल."

## पाकिस्तानची चिथावणी

परंतु पाकिस्तानची भूमिका अगदी भिन्न आहे, हे सागताना मला दुःख होते. आपल्या धोरणाने, वक्तव्याने व कृतीने त्याने, जाणूनबुजून दग्यांना चिथावणी दिली आहे. पाकिस्तानने जिहादची भाषा वापरण्यापूर्वी व पवित्र केसाच्या चोरीच्या प्रकरणात हिंदूंचा हात होता असा निराधार आरोप करण्यापूर्वी भारतातील या दोन जमातीमध्ये, सलोखा व शांतता होती. त्याने मुद्दाम व काही विशिष्ट हेतू साध्य करण्यासाठी, पूर्व पाकिस्तानमध्ये दगे

भडकतील असे वातावरण निर्माण केले. हजारो निरपराध लोकांची हत्या झाली. हे लोक हिंदू होते की मुसलमान होते, याला महत्त्व नाही. ज्या कृत्यांमुळे इतक्या लोकाची हत्या झाली ते कृत्य धर्मवेड्या हिंदूचे किंवा मुसलमानाचे किंवा हिंदू अथवा मुसलमान गुंडाचे असू शकेल. परंतु या निरपराधी लोकांच्या मृत्यूला पाकिस्तान जबाबदार नाहीं असे म्हणता येणार नाही. व त्याला दोषमुक्त करता येणार नाही. आम्ही सर्व नागरिकांना समान लेखतो. आम्ही सर्वांना सारखे हक्क देतो व आम्हाला संपूर्ण जातीय सलोखा हवा आहे. आम्ही यशस्वी रीतीने हा सलोखा निर्माण केला आहे व आमच्या या कार्यात कोणी व्यत्यय आणला नाही तर आमच्या देशात कधीहीं जातीय दंगे होणार नाहीत. परंतु जेव्हा जेव्हा जातीय दंगे होतात तेव्हा अत्यंत कडक उपाय योजून आम्ही त्यांचा बीमोड करतो. या उलट, पाकिस्तानने त्याच्या निर्मितीपासूनच, आपले धोरण जातीय द्वेषभावावर व धर्मांधतेवर आधारले आहे. त्याने काश्मीरमधील मुसलमानांना भारताविरुद्ध बंड पुकारण्याची चिथावणी दिली आहे आणि आपला द्विराष्ट्रवादाचा सिध्दांत तो सतत मांडत आला आहे.

आपसातील संबंध सुधारण्यासाठी आम्ही काय केले आहे व पाकिस्तानने त्याची परतफेड कशाने केली आहे, याविषयी मी आता माहिती देतो. आमच्या पंतप्रधानांनी पाकिस्तानला, अनेक वेळा, "'युध्दबंदी घोषणे' चा करार करण्याची विनंती केली. त्यांनी सांगितले की दोन्ही देशांनी आपले मतभेद शांततेने मिटवले पाहिजेत. व कोणत्याही कारणास्तव व कोणत्याही परिस्थितीत कोणत्याही देशाने दुसऱ्या देशाशी युध्द न करण्याचा निर्धार केला पाहिजे. परंतु ही सूचना पाकिस्तानने फेटाळली. याचे कारण काय ? असे करण्यात पाकिस्तानला संकोच वाटतो काय ? काही विशिष्ट परिस्थितीत भारता-विरुध्द हिंसात्मक मार्गांचा अवलंब करायचा त्याचा विचार आहे काय ? अलीकडे दंगे झाले तेव्हा आमच्या राष्ट्रपतींनी, अध्यक्ष अयूबखान याना, शांतता आणि सलोखा राखण्याची आपापल्या लोकांना विनंती करणारे संयुक्त पत्रक काढण्याची विनंती केली होती. संयुक्त विनंतीपत्रक काढण्याची ही

सूचना अगदी रास्त होती. दोन्ही देशांच्या प्रमुखांनी संयुक्तपणें अशी विनंती केली असती तर केवळ एवढ्यामळे सुध्दा अत्यंत योग्य मानसिक परिणाम घडला असता. परंतु ही विनंतीही फेटाळण्यात आली. भारत व पाकिस्तान यांच्या गृहमंत्र्यांनी परस्परांची भेट घ्यावी, दंगलग्रस्त भागांना भेट द्यावी व असे प्रकार पुन्हा घडू नयेत म्हणून आणखी कोणते उपाय योजावे हे सुचवावे, अशी सूचना आम्ही नंतर केली. त्यावर पाकिस्तानने उलट जी सूचना केली, ती म्हणजे आमच्या सूचनेला दिलेला जवळ जवळ नकारच होता

काश्मीरबाबत, भारत आणि पाकिस्तान यांच्यात झालेल्या काही बोलण्यांचा पाकिस्तानच्या परराष्ट्र मंत्र्यांनी उल्लेख केला व ही बोलणी भारताच्या हटवादीपणामुळे अयशस्वी झाली असे सिध्द करण्याचा प्रयत्न केला. पाकिस्तानमध्ये, रावळपिंडी येथे, बोलण्यांची पहिली फेरी व्हायच्या आदल्या दिवशी, जम्मू व काश्मीरचा जो भाग पाकिस्तानने बेकायदेशीरपणे बळकावला आहे, तो व सिंकियांग, यांच्यामधली सरहद्द आखण्याबाबत तत्वत: एकमत झाल्याचे पाकिस्तानने जाहीर केले. त्याच वेळी आम्हाला वाटाघाटी मोडता आल्या असत्या व ते न्याय्यही ठरले असते. परंतु प्रक्षुब्ध न होता, त्या चालू ठेवण्याचे आम्ही ठरवले. मार्चमध्ये वाटाघाटी चालू असताना, श्री० भुट्टो पेकिंगला गेले व त्यांनी करारावर सही केली. तरीसुध्दा आम्ही पुन्हा संयम दाखवला व पाकिस्तानच्या प्रक्षोभक वर्तनाचा कळस झालेला असताना सुध्दा आम्ही बोलणी चालू ठेवली. ती चालू ठेवण्याचे आम्ही सर्वतोपरी प्रयत्न केले असले तरी अखेरीस पाकिस्तानचे परराष्ट्रमंत्री श्री० भुट्टो यांनी वाटाघाटी मोडल्या. यावरून आमची भूमिका नव्हे, तर पाकिस्तानची भूमिका हटवादीपणाची होती, हेच सिध्द होते.

## पाकिस्तानचा चीनच्या बाजूने प्रचार

आता आपण पाकिस्तानची भूमिका, भारताच्या भूमिकेपासून किती भिन्न आहे ते पाहू या ! जेव्हा चीनने आमच्यावर हल्ला केला, आमच्यावर धडधडीत व निर्लज्जपणे आक्रमण केले, तेव्हा पाकिस्तानने आमच्या विरुध्द व

चीनच्या बाजूने जोरदार प्रचार केला. आमच्यावर भयानक संकट कोसळलेले असताना, मित्र देशांनी आम्हाला मदत करू नये, या दृष्टीनेच पाकिस्तानने त्यांचे मन वळवायचा सर्वतोपरी प्रयत्न केला. परंतु तो एवढ्यावरच थांबला नाही तर चीनने नव्हे तर भारतानेच आक्रमण केले आहे, अशी भूमिका त्याने घेतली वस्तुतः एका निष्ठुर आक्रमणाला आम्ही बळी पडलो, हे जवळ जवळ संपूर्ण जगाने पाहिले व याबद्दल त्याची खात्री पटली.

शांतता कायम राखण्याबाबत, व जागतिक प्रश्न हिंसेने नव्हे तर शांततेने व वाटाघाटी करून सोडवण्याबद्दल पाकिस्तानच्या परराष्ट्रमंत्र्यांनी फारच सुन्दर विचार व्यक्त केले. त्यांच्या विचारांशी व त्याच्या भावनाशी आम्ही पूर्णपणे सहमत आहोत या विचारांना व भावनांना आम्ही नेहमीच पाठिंबा देत आलेलो आहोत. पाकिस्तान निरपराध्यांचे सोंग घेऊन सुरक्षितता मंडळाकडे आला आहे, आपली भूमिका ही नेहमी शांततामय व मित्रत्वाची राहिली आहे व आपण केव्हाही भारताला प्रक्षुब्ध केलेले नाही असे तो म्हणत आहे परंतु याचा सत्यस्थितीशी मुळीच मेळ बसत नाही. पाकिस्तानातील जबाबदार व्यक्तींनी वेळोवेळी उघडपणे, हिंसेला चिथावणी दिली आहे, व काश्मीरचा प्रश्न शांततेने सोडवता येत नसला तर तो हिंसात्मक मार्गानेच सोडवला पाहिजे असे सतत सांगितले आहे. परराष्ट्रमंत्र्यांच्या १६ जानेवारीच्या ज्या पत्राचा सुरक्षितता मंडळ सध्या विचार करीत आहे, त्या पत्रातील निष्कर्ष सुध्दा अत्यंत सूचक आहे तो असा की आझाद काश्मीर व पाकिस्तान यांच्यातील लोक चिडून अन्य मार्गांकडे वळतील. हे अन्य मार्ग कोणते ? शांततामय मार्गाखेरीज अन्य मार्ग म्हणजे हिंसा आणि रक्तपात ! जागतिक शांतता व देशादेशामध्ये चांगले संबंध राखण्याची जबाबदारी जिच्यावर आहे अशा एका संघटनेला पाठवलेल्या जाहीर पत्रात, या संघटनेच्या एखाद्या सभासद-देशाने विशिष्ट परिस्थितीत, हिंसेचा अवलंब करण्याची उघड-उघड धमकी देण्याचा प्रकार घडल्याचे मला क्वचितच आढळले आहे. अशा परिस्थितीत, पाकिस्तानच्या परराष्ट्र मंत्र्यांच्या निवेदनाची आपण कशी काय दखल घेऊ शकतो ?

## पाकिस्तानची संधिसाधू वृत्ती

१७ जून १९६३ च्या 'ऑब्झर्व्हर' मध्ये ब्रिटिश मजूर पक्षाचे दिवंगत सभासद, जॉन स्ट्रॅची यांचे एक पत्र प्रसिध्द झाले होते. त्याचा मी उल्लेख करतो. एका पार्लमेंटरी शिष्टमंडळाचे सभासद म्हणून भारत व पाकिस्तान या दोन्ही देशांना त्यांनी भेट दिली होती. 'ऑब्झर्व्हर' च्या संपादकाला पाठवलेल्या पत्रात त्यांनी म्हटले आहे :—

"आपल्या सैन्याचा बराच मोठा भाग भारत अजूनही पाकिस्तानला लागून असलेल्या सरहद्दीवर ठेवतो अशी तुम्ही तक्रार केली आहे. गेल्या महिन्यात पाकिस्तानला जाण्यापूर्वी मला सुध्दा असे वाटले होते की भारताने या सरहद्दीवर आपले सैन्य ठेवणे समर्थनीय नाही. परंतु आम्ही पाकिस्तानात होतो त्या आठवड्यात, पाकिस्तानच्या एका मंत्र्याने अशी जाहीर घोषणा केली की काश्मीरचा प्रश्न तावडतोब, शांततेने किंवा अन्य मार्गाने सोडवलाच पाहिजे. पाकिस्तानमधील महत्वाच्या पदावरील दुसऱ्या एका व्यक्तीने आम्हाला खात्रीपूर्वक सांगितले की चीनने पुन्हा हल्ला केला तर मी आणि माझे मित्र ती संधी सोडणार नाही व आम्ही भारतावर तावडतोब हल्ला करू. आम्ही पाकिस्तानात ज्या पुढाऱ्यांना भेटलो त्यांच्यापैकी जवळजवळ प्रत्येकाने, भारतानेच चीनवर हल्ला केला असे गृहीत धरून संभाषणाला सुरुवात केली."

श्री० जॉन स्ट्रॅची, पार्लमेंटचे एक आदरणीय सभासद होते. पाकिस्तानचा एक मंत्री व पाकिस्तानातील इतर जबाबदार पुढारी, यांनी त्यांना काय सांगितले, हे त्यांनी स्वतःच सांगितले आहे. जेव्हा संधी मिळेल तेव्हा आमच्या देशाविरुध्द हिंसेचा उपयोग करण्याचा विचार पाकिस्तानी पुढाऱ्यांच्या मनात नेहमी घोळत राहिला आहे, हे यावरून स्पष्ट होते.

या संबंधात, काश्मीरसंबंधीच्या पाकिस्तानच्या नव्या भूमिकेचा मला येथे उल्लेख करावासा वाटतो. पाकिस्तानच्या परराष्ट्र मंत्र्यांच्या भाषणाचे

पृथक्करण केल्यास, त्यांच्या मनातील जी भावना व्यक्त होते ती अशी:— पाकिस्तानचे समाधान होईल, अशा रीतीने भारताने काश्मीरचा प्रश्न सोडवला पाहिजे, तसे जर त्याने केले नाही तर जातीय दंगे भडकतील, उपद्रव होईल व कदाचित् रक्तपातही होईल.' म्हणून पाकिस्तानने मंडळाकडे जी धाव घेतली आहे ही विनंती करून नव्हे तर धमकी देऊन व या धमकीसमोर आम्ही नमले पाहिजे असे आम्हाला सांगण्यात येत आहे. भारत व पाकिस्तान या दोन्ही देशातील लक्षावधी लोकांना आपण राजकारणी लोकांच्या हातातील केवळ एक बाहुले बनवीत आहोत, याची पाकिस्तानला जाणीव होत नाही, ही दुर्दैवाची गोष्ट आहे.

आज चीनच्या विस्ताराला व आक्रमणाला पायबंद घालण्यासाठी कटिबद्ध होऊ शकणारा, भारत हाच बहुधा एकमेव देश आहे. भारताला त्यात यश आले नाही तर चीनच्या विस्तारवादी धोरणाला कशानेही पायबंद घालता येणार नाही म्हणून केवळ भारताच्याच हिताच्या दृष्टीने नव्हे तर शांतता स्थापनेच्या दृष्टीनेहि भारत सामर्थ्यसंपन्न असला पाहिजे. मित्र देशांकडून आम्हाला जी मदत मिळाली आहे, तिच्याबद्दल आम्ही अत्यंत कृतज्ञ आहोत. परंतु भारत आतून दुबळा झाला तर ही मदत सर्वस्वी निरर्थक ठरेल. आंतरिक सामर्थ्य नसताना, कोणताही देश, आंतरराष्ट्रीय दृष्टीने मजबूत राहू शकत नाही. भारताचे आंतरिक सामर्थ्य, त्याच्या धर्मनिरपेक्षतेवर, व त्यात राहात असलेल्या निरनिराळ्या जमातींमध्ये शांतता व सलोखा नांदण्यावर अवलंबून आहे.

## भारताला दुबळें करण्याची पाकिस्तानची इच्छा

भारत सामर्थ्यसंपन्न होऊ नये अशी पाकिस्तानची इच्छा आहे. आतून व आंतरराष्ट्रीय दृष्ट्या भारताला दुबळे करण्याची त्याची इच्छा आहे. चीन-बरोबर त्याचे अलीकडेच जे संगनमत झालें आहे, तो त्याचा स्पष्ट पुरावा आहे. या संदर्भात काश्मीरच्या प्रश्नाला अत्यंत महत्त्व प्राप्त होते. काश्मीर-बाबतच्या 'जैसे थे' स्थितीत, भारत बदल घडवून आणीत आहे, अशी तक्रार

पाकिस्तान करीत आला आहे आणि तरीसुध्दा, चीनशी सरहद्द करार करून त्याने काश्मीरचा दोन हजार चौरस मैलांहून जास्त मोठा भाग चीनला देऊन टाकला आहे. या भागावर पाकिस्तानचा मुळीच हक्क पोचत नाही. पाकिस्तानची ही कृती, हलवायाच्या घरावर तुळशीपत्र ठेवण्यासारखी आहे. "जैसे थे" स्थितीत घडघडीत बदल जर कोणी केला असेल तर तो पाकिस्तानने केला आहे. परंतु, कायद्याच्या व घटनेच्या दृष्टीने काश्मीर हा भारताचा भाग आहे, द्विराष्ट्रवाद सिध्दांत आम्हाला मान्य नाही, काश्मीर हे आमच्या धर्मनिरपेक्षतेचे प्रतीक व धर्मनिरपेक्षतेची हमी आहे, ही सत्ये क्षणभर बाजूला ठेवली तरी, चीनचा जो सतत चालू राहणारा उपद्रव निर्माण झाला आहे, त्यामुळे काश्मीरच्या प्रश्नाला अत्यंत महत्त्व प्राप्त झाले आहे. भारताच्या नकाशाकडे ओझरती नजर टाकली तरी सुध्दा ही गोष्ट पुरेशी स्पष्ट होईल.

पाकिस्तानच्या परराष्ट्रमंत्र्यांनी शेख अब्दुल्ला यांची मुक्तकंठाने प्रशंसा केली आहे. त्यांनी आपल्याला सांगितले की शेख अब्दुल्ला हे 'काश्मीर केसरी' आहेत, तेथील मुसलमानांचे पुढारी आहेत. आणि आम्ही त्यांना तुरुंगात टाकले आहे. शेख अब्दुल्ला यांच्याविषयी पाकिस्तानचेच पंतप्रधान लियाकतअली खान काय म्हणाले होते त्याचे त्यांना स्मरण करून द्यावेसे मला वाटते:

"पंडित जवाहरलाल नेहरू यांच्या श्रीनगरमधील भेटीच्या वेळी १० नोव्हेंबर रोजी बातमीदारांशी बोलताना, शेख अब्दुल्ला यांनी असे सांगितल्याचे समजते की सार्वमत कदाचित घेतलेही जाणार नाही……अनेक वर्षे काँग्रेसचा हस्तक असलेला हा पंचमस्तंभी, तुरुंगात खितपत पडलेल्या काश्मीरमधील मुसलमानांच्या जीविताचा, प्रतिष्ठेचा व स्वातंत्र्याचा सौदा करीत फिरतो आहे."

श्री० लियाकत अली खान यांनी १६ नोव्हेंबर, १९४७ रोजी हे निवेदन केले. दुसऱ्या शब्दात सांगायचे म्हणजे पाकिस्तानला जेव्हा व जसे सोयीचे

असेल तेव्हा शेख अब्दुल्ला पंचमस्तंभी असतात किंवा ते 'काश्मीर केसरी व मुसलमानाचे पुढारी असतात. आता त्याचा सूर पुन्हा केव्हा बदलेल हे हे मला माहीत नाही.

२५ नोव्हेंबर १९४७ रोजी भारताच्या पंतप्रधानांना पाठवलेल्य तारेत पाकिस्तानच्या पंतप्रधानांनी म्हटले होते.:—

"शेख अब्दुल्ला हे पंचमस्तंभी आहेत व काश्मीरमधील मुसलमाना-मध्ये दुही माजवणारे ते भाडोत्री हस्तक आहेत हे तुम्हाला माहीत असून सुध्दा तुम्ही त्याना पाठिंबा देता, हे पाहून मला अत्यंत वाईट वाटते."

ज्याला पाठिंबा द्यायला नको अशा एका पंचमस्तंभी व्यक्तीला पाठिंबा दिल्याचा, आमच्या पंतप्रधानांवर या तारेत आरोप करण्यात आला होता.

शेख अब्दुल्ला यांच्यावरील खटल्याविषयी मी येथे थोडेसेच (कारण ही बाब न्यायालय प्रविष्ट आहे) बोलू इच्छितो. खटल्याचे काम पूर्ण करायला विलब लागतो आहे यावद्दल आम्हाला खेद होतो. परंतु कायद्यात नमूद केलेल्या पध्दतींनुसार त्याचे कामकाज चालवले जात आहे. खटल्याचे काम सुरू झाले तेव्हा लंडनच्या 'टाइम्नेस' आपल्या वातमीपत्रात, या खटल्याचे काम चालवणारे न्यायाधीश किती नि:पक्षपाती आहेत, व फिर्यादी आणि आरोपी या दोन्ही पक्षांना ते कसे समान लेखतात हे स्पष्ट केले.

पाकिस्तानच्या परराष्ट्रमंत्र्यांनी म्हटल्याप्रमाणे, साक्षीदारांची संख्या फार मोठी आहे, हे खरे आहे. कटाच्या खटल्यात ही गोष्ट अपरिहार्य आहे. कामकाजाला जो विलंब लागतो आहे, त्याची कारणे म्हणजे आरोपीच्या पक्षाने, साक्षीदारांची प्रदीर्घ उलटतपासणी केली व खुद्द शेख अब्दुल्ला यांच्यासाठी वेळोवेळी तारखा द्याव्या लागल्या, हेही मला येथे सांगाय-लाच हवे. या खटल्याचे अत्यंत महत्त्वपूर्ण वैशिष्ट्य म्हणजे शेख अब्दुल्ला

यांना त्यांच्या इच्छेनुसार वकील निवडू देण्यात आला. लंडन बारचे एक अत्यंत विख्यात वकील श्री० डिंगल फूट, हे त्यांचे वकील आहेत. हा खटला जाहीरपणे चालवला जात आहे व आरोपीला आपला बचाव करण्यासाठी सर्व सोयी दिल्या जात आहेत.

पाकिस्तानच्या परराष्ट्रमंत्र्यांनी केलेले निवेदन उद्धृत करून आणखी एका बाबीचा मी उल्लेख करतो. "काश्मीरला बाहेरच्या जगापासून तोडून टाकणाऱ्या "पोलादी भिंतीचा" त्यांनी उल्लेख केला आहे. व त्यांनी असे म्हटले आहे की, "प्रसिध्दीपूर्व कडक नियंत्रण बसवून काश्मीरमध्ये काय घडते आहे, हे लपवण्याचा भारत, कसोशीने प्रयत्न करीत आहे. ( १०८७ वी बैठक, पान ८ ) मला असे म्हणायचे आहे की ज्या एका गोष्टीबद्दल आम्हाला विशेषेकरून अभिमान वाटतो ती गोष्ट म्हणजे कोणत्याही देशातील, कोणत्याही नागरिकाला भेट देण्यासाठी काश्मीरचा दरवाजा नेहमीच खुला राहिलेला आहे. काश्मीरमध्ये लपवण्यासारखे आमच्याजवळ काही नाही व तेथे आम्ही जे काही करीत आहोत, ते आम्हाला लज्जास्पदही वाटत नाही. दरवर्षी, परकी प्रवाशांसकट, ७० ते ८० हजार हौशी प्रवासी या अत्यंत निसर्गरम्य भागाला भेट देत आले आहेत.

## स्वयंनिर्णय—खरा व खोटा

पाकिस्तानने स्वयंनिर्णयाच्या कल्पनेचे बरेच स्तोम माजवले आहे. काश्मीरमधील लोकांना स्वयंनिर्णयाचा हक्क नाकारण्यात आला आहे, असे जाहीर करून, जगातील सर्व देशाचा पाठिंबा मिळवायचा पाकिस्तानने प्रयत्न केला आहे. पहिली गोष्ट अशी की या शब्दप्रयोगातील 'स्वयं' या शब्दाने काय व्यक्त होते, ते आपण निश्चित केले पाहिजे. आपले भवितव्य ठरवायचा ज्याला हक्क आहे—आपण या देशाचा एक भाग म्हणून राहावे, की त्या देशाचा एक भाग राहावे की स्वतंत्र राहावे, हे ठरवायचा ज्याला हक्क आहे, ते 'स्वयं' काय आहे ? या लोकशाही तत्त्वाच्या व्याख्येत जे 'स्वयं' अभिप्रेत आहे ते एखाद्या देशाचा घटक नाही

असेल तेव्हा शेख अब्दुल्ला पंचमस्तंभी असतात किंवा ते 'काश्मीर केसरी व मुसलमानांचे पुढारी असतात. आता त्याचा सूर पुन्हा केव्हा बदलेल हे मला माहीत नाही.

२५ नोव्हेंबर १९४७ रोजी भारताच्या पंतप्रधानांना पाठवलेल्या तारेत पाकिस्तानच्या पंतप्रधानांनी म्हटले होते.:—

"शेख अब्दुल्ला हे पंचमस्तंभी आहेत व काश्मीरमधील मुसलमानांमध्ये दुही माजवणारे ते भाडोत्री हस्तक आहेत हे तुम्हाला माहीत असूनसुध्दा तुम्ही त्याना पाठिंबा देता, हे पाहून मला अत्यंत वाईट वाटते."

ज्याला पाठिंबा द्यायला नको अशा एका पंचमस्तंभी व्यक्तीला पाठिंबा दिल्याचा, आमच्या पंतप्रधानांवर या तारेत आरोप करण्यात आला होता.

शेख अब्दुल्ला यांच्यावरील खटल्याविषयी मी येथे थोडेसेच ( कारण ही बाब न्यायालय प्रविष्ट आहे ) बोलू इच्छितो. खटल्याचे काम पूर्ण करायला विलंब लागतो आहे याबद्दल आम्हाला खेद होतो. परंतु कायद्यात नमूद केलेल्या पध्दतींनुसार त्याचे कामकाज चालवले जात आहे. खटल्याचे काम सुरू झाले तेव्हा लंडनच्या 'टाइम्नेस' आपल्या वातमीपत्रात, या खटल्याचे काम चालवणारे न्यायाधीश किती नि:पक्षपाती आहेत, व फिर्यादी आणि आरोपी या दोन्ही पक्षांना ते कसे समान लेखतात हे स्पष्ट केले.

पाकिस्तानच्या परराष्ट्रमंत्र्यांनी म्हटल्याप्रमाणे, साक्षीदारांची संख्या फार मोठी आहे, हे खरे आहे. कटाच्या खटल्यात ही गोष्ट अपरिहार्य आहे. कामकाजाला जो विलंब लागतो आहे, त्याची कारणे म्हणजे आरोपीच्या पक्षाने, साक्षीदाराची प्रदीर्घ उलटतपासणी केली व खुद्द शेख अब्दुल्ला यांच्यासाठी वेळोवेळी तारखा द्याव्या लागल्या, हेही मला येथे सांगायलाच हवे. या खटल्याचे अत्यंत महत्त्वपूर्ण वैशिष्ट्य म्हणजे शेख अब्दुल्ला

यांना त्यांच्या इच्छेनुसार वकील निवडू देण्यात आला. लंडन बारचे एक अत्यंत विख्यात वकील श्री० डिंगल फूट, हे त्यांचे वकील आहेत. हा खटला जाहीरपणे चालवला जात आहे व आरोपीला आपला बचाव करण्यासाठी सर्व सोयी दिल्या जात आहेत.

पाकिस्तानच्या परराष्ट्रमंत्र्यांनी केलेले निवेदन उद्धृत करून आणखी एका बाबीचा मी उल्लेख करतो. "काश्मीरला बाहेरच्या जगापासून तोडून टाकणाऱ्या "पोलादी भिंतीचा" त्यांनी उल्लेख केला आहे. व त्यांनी असे म्हटले आहे की, "प्रसिध्दीपूर्व कडक नियंत्रण बसवून काश्मीरमध्ये काय घडते आहे, हे लपवण्याचा भारत, कसोशीने प्रयत्न करीत आहे. ( १०८७ वी बैठक, पान ८ ) मला असे म्हणायचे आहे की ज्या एका गोष्टीबद्दल आम्हाला विशेषेकरून अभिमान वाटतो ती गोष्ट म्हणजे कोणत्याही देशातील, कोणत्याही नागरिकाला भेट देण्यासाठी काश्मीरचा दरवाजा नेहमीच खुला राहिलेला आहे. काश्मीरमध्ये लपवण्यासारखे आमच्याजवळ काही नाही व तेथे आम्ही जे काही करीत आहोत, ते आम्हाला लज्जास्पदही वाटत नाही. दरवर्षी, परकी प्रवाशांसकट, ७० ते ८० हजार हौशी प्रवासी या अत्यंत निसर्गरम्य भागाला भेट देत आले आहेत.

## स्वयंनिर्णय—खरा व खोटा

पाकिस्तानने स्वयंनिर्णयाच्या कल्पनेचे बरेच स्तोम माजवले आहे. काश्मीरमधील लोकांना स्वयंनिर्णयाचा हक्क नाकारण्यात आला आहे, असे जाहीर करून, जगातील सर्व देशाचा पाठिंबा मिळवायचा पाकिस्तानने प्रयत्न केला आहे. पहिली गोष्ट अशी की या शब्दप्रयोगातील 'स्वयं' या शब्दाने काय व्यक्त होते, ते आपण निश्चित केले पाहिजे. आपले भवितव्य ठरवायचा ज्याला हक्क आहे—आपण या देशाचा एक भाग म्हणून राहावे, की त्या देशाचा एक भाग राहावे की स्वतंत्र राहावे, हे ठरवायचा ज्याला हक्क आहे, ते 'स्वयं' काय आहे ? या लोकशाही तत्त्वाच्या व्याख्येत जे 'स्वयं' अभिप्रेत आहे ते एखाद्या देशाचा घटक नाही

वा असू शकत नाही. संपूर्ण राष्ट्राचा आपण विचार करू तेव्हा ते लागू करता येईल व प्रदेश जिंकण्याच्या किंवा परकी वर्चस्वाच्य किंवा वसाहतशाही पिळवणुकीच्या संदर्भात ते लागू करता येईल कोणत्याही देशाच्या अविभाज्य भागाला किंवा त्याच्या लोक संख्येच्या एका भागाला हा शब्दप्रयोग लागू केला किंवा अशा अविभाज्य भागाला किंवा लोकसंख्येच्या भागाला, अलग होऊ देण्यासाठी हा शब्द प्रयोग लागू केला तर त्याचे भयानक परिणाम होतील. देशाचे तुकडे पाडण्यासाठी किंवा त्याच्या लोकसंख्येचा एक भाग, अलग करण्यासाठी, स्वयंनिर्णयाचे तत्त्व लागू करता येणार नाही, व ते लागू करता कामा नये एका लहान सहान भागाला नव्हे तर संपूर्ण दक्षिण भागाला, फुटून बाहेर पडायला व एक स्वतंत्र देश म्हणून अस्तित्वात येण्याला प्रतिबंध करण्यासाठी, अमेरिकेला रक्तरंजित यादवी युध्द करावे लागले, हे सत्य आपण विसरता कामा नये. दक्षिण भागातील प्रचंड बहुसंख्य लोकांचा आब्राहाम लिंकन यांना आणि त्यांच्या धोरणांना विरोध होता व गुलामांना मुक्त न करण्याचे त्यांना स्वातंत्र्य हवे होते आणि तरीसुध्दा अमेरिकेच्या सरकारने, आपल्या देशाच्या एका भागाला फुटून बाहेर पडू दिले नाही व देशाचे तुकडे होऊ दिले नाहीत. माझ्या मते अमेरिकेच्या सरकारने अत्यंत योग्य अशीच कृती केली. आज आशिया व आफ्रिका खंडात असे बरेच देश आहेत की जेथे भिन्न मते असलेल्या अल्पसंख्य जमाती आहेत. यातील बऱ्याच अल्पसंख्य जमातींना आपली स्वतःची सरकारे स्थापन करावीशी वाटतात. त्यांना तसे करू दिले तर आपल्याला जगाचा नकाशा बदलावा लागेल व संयुक्त राष्ट्र संघटनेच्या बऱ्याच सभासद देशाचे तुकडे होतील. आज बऱ्याच देशांमध्ये, निरनिराळया वंशाचे, धर्माचे व संस्कृतीचे लोक राहात आहेत व जगाच्या निरनिराळ्या भागात, विविध वंशाचे लोक खेळीमेळीने राहात असलेले देश उदयाला येण्यावर जगाचे भवितव्य अवलंबून आहे. पाकिस्तानचा सिध्दांत प्रतिगामी स्वरूपाचा आहे. स्वयंनिर्णयाच्या ज्या सिध्दांताचा, पाकिस्तान पुरस्कार करीत आहे त्याचा, अलीकडल्या काळात, वसाहतवादी व नववसाहतवादी देशांनी, नवोदित देशामध्ये फूट पाडण्यासाठी

त्यांचे तुकडे करण्यासाठी उपयोग केला आहे. पाकिस्तानला घड्याळाचे काटे उलटे फिरवायची इच्छा आहे व तसे त्याला करू दिल्यास, केवळ एकाच धर्माच्या लोकांना राहू देणारे व अन्य धर्मीयांचा छळ करणारे देश या काळात होते तो काळ- निर्माण होईल. शांतता व प्रगती यांना मारक ठरेल व बऱ्याच देशांचे तुकडे होतील असे विचार व युक्तिवाद मंडळाने विचारात घेऊ नये, अशी माझी मंडळाला विनंती आहे.

जे विचार पाकिस्तानने कधीही आचरणात आणले नाहीत, त्यांचा उपदेश करण्याचे थोर भाग्य पाकिस्तानला लाभले आहे. आपल्या स्वतःच्या देशात निवडणूक घेण्याचा विचार सुध्दा न करता, तो आम्हाला काश्मीरमध्ये सार्वमत घ्यायला सांगत आहे. आपल्या पायाखाली काय जळते आहे याचा विचार न करता, आमच्या देशाच्या एका भागाला आम्ही स्वयंनिर्णयाचे तत्र लागू करावे अशी त्याची इच्छा आहे. पठाण ज्याला पख्तूनिस्तान म्हणतात ते स्वतःचे वेगळे राज्य निर्माण करण्याची पठाणांची इच्छा आहे. यांना स्वयंनिर्णयाचा हक्क देण्याचा विचार तरी पाकिस्तानच्या मनात कधी आला आहे काय ?

## लोकांचे स्थलांतर

भारतातील मुसलमानांची हकालपट्टी केल्याचा जो आरोप पाकिस्तानने आमच्यावर केला आहे त्याचे मी आता युक्तिवादाने नव्हे तर निरुत्तर करणारी आकडेवार माहिती देऊन खंडन करतो.

१९६१ च्या भारतीय शिरगणती आकड्यानुसार, १९५१ ते १९६१ या काळात, भारतातील मुसलमानांची संख्या २५.६ टक्क्यांनी वाढली. व एकंदर लोकसंख्या २१.५ टक्क्यांनी वाढली. मुसलमान लोकांचा संहार करण्यात आला आहे किंवा त्यांची हकालपट्टी करण्यात आली आहे, असे यावरून सिध्द होते का ? एकही मुसलमान भारत सोडून जात नाही.

उलट पक्षी, पाकिस्तानी मुसलमान बऱ्याच मोठ्या संख्येने, आजूबाजूच भारतीय प्रदेशातल्या पश्चिम बंगाल, आसाम व त्रिपुरा या राज्या चोरटेपणाने शिरत आहेत. व ही गोष्ट पाकिस्तानच्या शिरगणतीच आकड्यांवरून निर्विवादपणे सिध्द होते. या आकड्यांनुसार, पूर्व पाकिस्तानाती मुसलमानांची लोकसंख्या, १९५१-६१ या काळात, २६ टक्क्यांनी वाढल परंतु भारताला लागून असलेल्या पूर्व पाकिस्तानच्या काही जिल्ह्यात फारच कमी वाढ झाली ही गोष्ट सूचक आहे. नोआखलीमध्ये फक्त ४. टक्के, कोमिलामध्ये १५.४ टक्के, बकरगजमध्ये १६.८ टक्के व सिल्हटमध फक्त १३.९ टक्के वाढ झाली. सरहद्दीलगतच्या भारतीय प्रदेशाती जिल्ह्यांच्या शिरगणतीच्या आकड्यावरून असे दिसून येते की त्रिपुरामध मुसलमानांची संख्या ६८ टक्क्यानी, दार्जिलिंगमध्ये २०० टक्क्यां दिनाजपूरमध्ये ७४ टक्क्यानी, मालदामध्ये ६२ टक्क्यानी, गारो हिल्समध्ये ४ टक्क्यांनी व खाशी व जंट्या जिल्ह्यात ८८ टक्क्यांनी वाढली. हे बोल आकडे आहेत. संपूर्ण भारतातील मुसलमानांची संख्या २५.६ टक्क्यां वाढली ही गोष्ट लक्षात घेता, हे आकडे अत्यत उद्बोधक ठरता लोकसंख्येसंबंधीची कोणतीहि नैसर्गिक बाब विचारात घेतली तरी हे दिसू येईल की केवळ एकाच कारणामुळे लोकसंख्येत इतकी जास्त वाढ झाल असली पाहिजे, व ते कारण म्हणजे पूर्व पाकिस्तानातून, विशेषतः पाकिस्तान च्या शिरगणती आकड्यानुसार ज्या जिल्ह्यात लोकसंख्येतील वाढ भलती कमी होती अशा जिल्ह्यातून मुसलमान भारतात मोठ्या संख्येने आले.

आता आपण दुसऱ्या बाजूला काय घडले ते पाहू. फाळणीनंत मोठ्या प्रमाणावर लोकांनी स्थलांतर केले व बऱ्याच लोकांची कत्तलहं झाली. पश्चिम पाकिस्तानातील जवळ जवळ सर्व मुसलमानेतरांचं हकालपट्टी करण्यात पाकिस्तानला यश मिळाले. पूर्व पाकिस्तानात, १९५१ च्या शिरगणती आकड्यानुसार, ९२ लाख ४० हजार मुसलमानेतर राहिले हा आकडा, पूर्व पाकिस्तानच्या एकूण लोकसंख्येच्या (४ कोटी १९ लाख ३० हजार) सुमारे २२.०३ टक्के आहे. १९६१ चा आकडा, ९३ लाख

८० हजार मुसलमानेतर आहे. पूर्व पाकिस्तानच्या एकूण लोकसंख्येचा (५ कोटी ८ लाख, ४० हजार) हा १८.४५ टक्के भाग आहे. दहा वर्षांमध्ये, हे प्रमाण सुमारे ३.६ टक्क्यांनी कमी झाल्याचे आपल्याला दिसून येईल. यापेक्षाही अधिक आश्चर्याची गोष्ट म्हणजे या दहा वर्षात पाकिस्तानातील मुसलमानांची संख्या २६ टक्क्यांनी वाढली असली तरी पूर्व पाकिस्तानातील हिंदू अल्पसंख्य लोकांची संख्या जवळ जवळ तेवढीच राहिली आहे. मुसलमानेतरांच्या संख्येत, अशीच नैसर्गिक वाढ झाली असती तर ती वाढ, २२ लाख ५० हजारांपेक्षा जास्त असायला हवी होती. ही नैसर्गिक वाढ का झाली नाही ? याचे उत्तर हे आहे की या दहा वर्षांत, त्या सर्वांची हकालपट्टी करण्यात आली. भारतात किती निर्वासित आले याविषयी आमच्याजवळ जी माहिती आहे, तिच्याशी हा आकडा जुळतो. पाकिस्तानच्या परराष्ट्रमंत्र्यांजवळ जर दुसरे काही उत्तर असेल तर त्यांनी ते द्यावे. अल्पसंख्य लोकांना हुसकावून लावण्याचा अपराध कोणी केला आहे, याचाही त्यांनी विचार करावा.

कायद्यामध्ये ज्या तरतुदी आहेत, त्यांचे पालन न करता कोणालाही भारताबाहेर हाकलून लावण्यात आलेले नाही, हेही मला स्पष्ट करायचे आहे. पहिली गोष्ट म्हणजे संबंधित व्यक्तीच्या राष्ट्रीयत्वासंबंधी, प्रशासन व्यवस्थेकडून काळजीपूर्वक छाननी केली जाते व ती व्यक्ती भारतीय नागरिक नाही किंवा तिच्याजवळ भारतात राहाण्यासाठी किंवा प्रवेश करण्यासाठी आवश्यक असलेला परवाना नाही, असे छाननी केल्यानंतर आढळले तरच तिच्यावर भारत सोडून जाण्याची नोटीस बजावण्यात येते. अशी नोटीस बजावण्यात आल्यानंतर त्या व्यक्तीला वरिष्ठ न्यायालयाकडे अर्ज करण्याचा व प्रशासकीय न्यायमंडळाचा निर्णय चुकीचा आहे, हे या अर्जाद्वारे सिध्द करण्याचा हक्क आहे. अलीकडे, आसाम व त्रिपुरामध्ये, नोटीस बजावण्यापूर्वी, छाननी करण्यासाठी सुध्दा न्यायालयीन अधिकारी नेमण्यात आले आहेत.

आणखी एका किरकोळ मुद्याचा मी येथे उल्लेख करतो तो म्हणजे जम्मू व काश्मीर राज्याच्या अलीकडेच वनदण्यात आलेल्या खात्यात

बऱ्याच मुसलमानेतरांची नेमणूक करण्यात आली आहे. नित्याच्या पार्लमेंटरी कार्यपध्दतीप्रमाणे, आपले मंत्रीमंडळ बनवायचा पूर्ण अधिकार जम्मू व काश्मीरच्या पंतप्रधानांना आहे. भारतात, जातीय बाबी व धर्म विचारात घेऊन नेमणूका केल्या जात नाहीत. सरकारमध्ये प्रतिनिधित्व होण्याच्या बाबतीत, भारताचा कोणताही भाग किंवा कोणतीही मोठी जमात पूर्णपणे वगळली जाऊ नये असा प्रयत्न आम्ही शक्यतोवर करतो. हे फेडरल राज्यव्यवस्थेचे तत्त्व असून फेडरल सरकारांना ते पूर्ण परिचयाचे आहे. काश्मीरचे मंत्रीमंडळ, राज्यामध्ये असलेले जातीय ऐक्य व सलोख यांचे खरेखुरे प्रतीक ठरावे हा काश्मीरचा गौरव आहे.

काश्मीरचे पंतप्रधान श्री० शमसुद्दीन यांनी राज्य सरकारच्या अधिकाऱ्यांना बडतर्फ केल्याचा जो उल्लेख पाकिस्तानच्या परराष्ट्रमंत्र्यांनी केला आहे, तो बरोबर नाही. त्यांना बडतर्फ करण्याची जी कारणे परराष्ट्रमंत्र्यांनी सांगितली आहेत, ती बरोबर नाहीत भ्रष्टाचार व प्रशासनातील गैरव्यवस्था, यांच्या विरुध्द सुरू केलेल्या मोहिमेचा एक भाग म्हणून त्यांना काढून टाकण्यात आले. त्यातील सर्व अधिकाऱ्यांना बडतर्फ करण्यात आले नाही. बऱ्याच जणाना निवृत्त करण्यात आले. यापैकी ६० हिंदू व शीख आहेत या गोष्टीला जे जातीय स्वरूप दिले जात आहे ते पूर्णपणे निराधार आहे.

माझे भाषण संपवण्यापूर्वी पाकिस्तानच्या परराष्ट्रमंत्र्यांनी सुरक्षितता मंडळाला १६ जानेवारी, १९६४ रोजी पाठविलेल्या पत्रातील ( एस्-५५१७ ) व त्यांच्या निवेदनातील इतर काही मुद्याचा उल्लेख करायची माझी इच्छा आहे. भारतीय राष्ट्रीय कॉंग्रेसच्या भुवनेश्वर अधिवेशनात, भारताचे गृहमंत्री श्री० नंदा यांनी जे निवेदन केले ते प्रक्षोभक होते अशी तक्रार परराष्ट्रमंत्र्यांनी केली आहे. श्री० नंदा यांनी हिंदीत भाषण केले व त्याचा पूर्ण मजकूर येथे उपलब्ध आहे. जातीय भावना व्यक्त होईल किंवा त्या प्रक्षुब्ध होतील असे काहीही श्री० नंदा यांच्या भाषणात मला आढळले नाही श्री० नंदा म्हणाले:—

"जरी तेथे ( पाकिस्तानात ) काही गैर प्रकार घडले, तरी येथे (भारत) आपण कोणतेही गैरप्रकार घडू देता कामा नये. आणि काही उपद्रव सुरू झाला तर कडक उपाय योजण्यात यावेत व सर्व काही तावडतोब पूर्ववत ताळयावर आणून परिस्थिती स्थिरस्थावर करण्यात यावी"

. श्री० नंदा यांच्या भाषणाच्या एखाद्या चुकीच्या इंग्रजी अनुवादाचा पाकिस्तानच्या परराष्ट्रमंत्र्यांनी आधार घेतला हे उघड आहे. वस्तुतः जातीय भावना चेतविण्याऐवजी श्री० नंदा यांनी, कलकत्यामध्ये, हिंदू-मुसलमानांमध्ये सलोखा निर्माण करण्याच्या व शांतिपथके स्थापन करण्याच्या कामात अत्यंत महत्त्वाची भूमिका बजावली. याच्या जोडीला, गुंडांचा बंदोबस्त करण्यासाठी, आवश्यकता भासली तेव्हा गोळीबार करून व इतर कडक उपाय योजून कलकत्त्यासारख्या ६० लाख लोकवस्तीच्या प्रचंड शहरातली परिस्थिती २ ते ३ दिवसांच्या आत आटोक्यात आणण्यात आली, ही गोष्ट लक्षात घ्यायला हवी.

भारतीय राष्ट्रीय काँग्रेसने नेहमीच जातीय ऐक्याला व सलोख्याला पाठिंबा दिला आहे. व श्री० नंदा यांनी याच काँग्रेसच्या अधिवेशनात केलेले हे भाषण आहे. तेव्हा गृहमंत्रीच काय पण कोणताहि मंत्री, तिच्या व्यासपीठावरून भाषण करताना, प्रक्षोभक भाषणे करील, अशी कल्पनाही करता येणार नाही.

## १६ जानेवारी, १९६४ चे राष्ट्रपतींचे पत्र

पाकिस्तानच्या परराष्ट्रमंत्र्यानी आपल्या निवेदनात असे म्हटले आहे की अध्यक्ष अयूबखान यांच्या पत्राला भारताच्या राष्ट्रपतींनी पाठवलेले उत्तर समाधानकारक व उपयुक्त नव्हते. आमच्या राष्ट्रपतींनी १६ जानेवारीला जे पत्र पाठवले ते सुरक्षितता मंडळाच्या सभासदामध्ये प्रसृत करण्यात आले असून त्यातील शेवटच्या परिच्छेदापेक्षा अधिक समाधानकारक, उपयुक्त व कळकळीचा मजकूर आणखी कोणता असू शकेल ? ( एस-५५२२ ) आमच्या राष्ट्रपतींनी, २६ जानेवारी, १९६४ रोजी प्रजासत्ताक दिनी जे निवेदन केले

त्यातही तीच कळकळ व्यक्त झाली असून, त्याचाही मी नंतर उल्लेख करीन. त्यांच्या पत्रातील मजकूर असा आहे —

"आपल्या लोकशाहीत, सर्व धर्मांच्या लोकांना कायद्याचे पालन करुन, प्रतिष्ठेने व सलोख्याने राहण्याचा हक्क आहे, प्रत्येक नागरिकाचे जीवित व स्वातंत्र्य, मग त्याची जात अथवा धर्म कोणताही असो, प्रत्येकाला पवित्र वाटायला हवे. या तत्त्वाचे यत्किंचितही उल्लंघन करणे, हे नैतिक दृष्ट्या असमर्थनीय आहे. इतकेच नव्हे तर ते राजकीय दृष्ट्या धोक्याचे आहे. आपल्या देशाला बाहेरुन निर्माण झालेला धोका कमी झालेला नाही. अशा वेळी, या तत्त्वाचे उल्लंघन केल्यास आपले ऐक्य दुबळे होईल. गुंडगिरीला दडपून टाकण्यासाठी, सरकार आवश्यक ते सर्व उपाय योजू शकते व ते योजले जातील परंतु शांतता राखायची असेल तर लोकांचें सहकार्य मिळणेही तितकेच महत्त्वाचें आहे. शांततेच्या परिस्थितीतच आपण प्रगती करु शकतो"

याच्या उलट, पाकिस्तानच्या अध्यक्षांनी आपल्या पत्रात, भारतावर अत्यंत गंभीर स्वरूपाचे काही आरोप केले आहेत. ही बाब यथार्थपणे मांडली जाण्यासाठी आमच्या राष्ट्रपतींना पाकिस्तानी अध्यक्षांच्या पत्रातील चुकांकडे त्यांचे लक्ष वेधावे लागले. आमच्या राष्ट्रपतींनी जो संदेश पाठवला, तो सद्भावना-युक्त होता व दोन्ही देशांसमोर जातीय सलोखा पुन्हा स्थापन करण्याचा जो अत्यंत तातडीचा प्रश्न उभा आहे तो सोडवण्याचा प्रयत्न करणारा विधायक दृष्टिकोन त्यात व्यक्त झालेला होता.

## वसाहतशाहीविरोधी लढ्यातील भारताचा पुढाकार

काश्मीरमधील भारताची उपस्थिती वसाहतशाहीद्योतक आहे, असे पाकिस्तानच्या परराष्ट्रमंत्र्यांनी म्हटले आहे. माझ्या देशावर त्यांनी इतका उपमर्दकारक आरोप करावा, याबद्दल मला अत्यंत दुःख होते. गेल्या ५० वर्षातील भारताचा इतिहास एक तर त्यांना माहीत नाही किंवा त्याकडे ते जाणूनबुजून दुर्लक्ष करीत आहेत. एका सर्वांत बलाढ्य

साम्राज्याविरुध्द महात्मा गांधींच्या नेतृत्वाने चालवलेल्या ज्या प्रदीर्घ लढ्यामुळे भारताला व त्यांच्या देशाला स्वातंत्र्य मिळाले तो वसाहतशाही विरोधी महान लढा भारताने चालवलेला होता, याचे त्यांना विस्मरण झालेले दिसते. आशिया व आफ्रिका खंडातील वसाहतशाही विरोधी सर्व चळवळीवर भारतीय चळवळीचा जो प्रचंड प्रभाव पडला त्याची व या चळवळीपासून त्यांना जी प्रेरणा मिळाली व आजही संपूर्ण जगातील अशा चळवळींना जी प्रेरणा मिळते आहे तिची त्यांना जाणीव नाही, असे कसे म्हणता येईल. आशिया व आफ्रिका खंडातील नवोदित देशानी, हा प्रभाव व ही प्रेरणा मान्य केली आहे या जाणीवेने आम्हाला अत्यंत समाधान वाटते. संयुक्त राष्ट्र संघटनेचा एक स्वतंत्र संस्थापक देश या नात्याने गेल्या १६ वर्षांत, भारत संयुक्त राष्ट्र संघटनेत वसाहतशाही विरुध्द सतत झगडत आहेव ' आशिया आणि आफ्रिका खंडातील स्वातंत्र्य चळवळींना तो पाठिंबा देत आहे, या सत्यस्थितीकडे त्यांनी पूर्णपणे दुर्लक्ष केले आहे. अशा रीतीने झगडणाऱ्या एका देशाला, 'वसाहतशाही' असे संबोधून त्याला बदनाम करताना पाहून दूषित पूर्वग्रहाची मजल कोठवर जाऊ शकते याची कल्पना येते. भारताच्या आजच्या पुढाऱ्यांच्या विशेषतः पंतप्रधान श्री० जवाहरलाल नेहरू यांच्या आयुष्याचा बराच मोठा भाग, केवळ स्वतःच्याच देशाच्या नव्हे तर आशियाई व आफ्रिकी देशांच्याही स्वातंत्र्यासाठी झगडण्यात गेला आहे. अशा पुढाऱ्यांवर वसाहतशाही धोरण अनुसरण्याचा आरोप करणे, ही गोष्ट एक पाकिस्तानच करू जाणे ! वस्तुस्थिती अशी आहे की काश्मीर हा इतिहासाच्या प्रारंभापासून भारताचा भाग राहिला आहे, भारतीय संस्कृती व परंपरा, यांचे ते आगर राहिलेले आहे. भारताच्या इतिहासातील स्थित्यंतरात काश्मीर पूर्णतया सहभागी झाला होता. अशोक व अकबर यांच्या साम्राज्याचा तो एक भाग होता. काश्मीरची राजधानी श्रीनगर, हे शहर सम्राट अशोकाने ख्रि० पू० तिसऱ्या शतकात वसविले. काश्मीरमधील लोकांशी आमचे रक्ताचे नाते आहे, जम्मू व काश्मीर हे भारतीय संघराज्याच्या १६ राज्यांपैकी एक राज्य

आहे व भारतीय नागरिकांप्रमाणेच काश्मीरी लोकही, संपूर्ण स्वातंत्र्याचा उपभोग घेत आहेत.

काश्मीर भारताच्या वसाहतशाही मगरमिठीत आहे, असे म्हणणे ही शुद्ध, भारताची निंदानालस्ती आहे, भारतीय असलेल्या व सदैव भारतीय राहिलेल्या काश्मीरी लोकांचा हा उपमर्द आहे. खरे सांगायचे म्हणजे पाकिस्तानने आपल्या स्वतःच्या अंतःकरणात काय आहे हे तपासून पाहण्याची व काश्मीरचा दोनपंचमांश भाग आपण कसा काय व्यापू शकतो हा प्रश्न स्वतःला विचारण्याची वेळ आली आहे. पाकिस्तानने बेकायदेशीरपणे हा भाग व्यापला, ही वसाहतशाही नाही तर मग काय आहे ?

## काश्मीर हाच एकमेव प्रश्न नाही

भारत व पाकिस्तान यांच्यातील भांडणाचे काश्मीर हे एकमेव कारण आहे व हा प्रश्न पाकिस्तानचे समाधान होईल अशा रीतीने सोडवल्यानंतर या दोन देशांमध्ये मित्रभाव व संपूर्ण सहकार्याची वृत्ती नांदू लागेल, असे अनेक वेळा सांगण्यात येते व पाकिस्तानच्या परराष्ट्र मंत्र्यांनीही हे बरेच वेळा सांगितले आहे, असे मला वाटते, परंतु मी त्यांच्याशी सहमत नाही. मी अगोदरच सांगितल्याप्रमाणे, पाकिस्तानचे धोरण, ज्या मूलभूत तत्त्वज्ञानावर आधारलेले आहे, ते समजणे फार कठीण आहे. त्याच्या परराष्ट्रीय धोरणाच्या प्रत्येक पैलूत, भारतविरोधी भूमिका स्पष्ट होते. जबाबदार पाकिस्तानी पुढाऱ्यांनी आम्हाला असे सांगितले की भारताच्या काश्मीरविषयक धोरणामुळे ते चीनकडे खेचले गेले. आपल्याशी मैत्री करण्याचे पाकिस्तानने दिलेले हे कारण चीनला आवडले नाही. म्हणून पाकिस्तानने आपला सूर बदलला व काश्मीरचा प्रश्न जरी सुटला तरीसुद्धा पाकिस्तान चीनलाच पाठिंबा देत राहील, असे सांगायला सुरुवात केली. हे दुसऱ्या शब्दात सांगायचे म्हणजे पाकिस्तानची भारताविषयीची आजची शत्रुत्वाची भावना केवळ काश्मीरच्या प्रश्नामुळे नाही तर ती त्यांच्या अंतःकरणात खोलवर रुजलेली भावना आहे.

जातीय दंग्यांसंबंधी पाकिस्तानचा हाच दृष्टिकोन आहे. काश्मीरचा प्रश्न सुटला तर जादूची कांडी फिरवल्याप्रमाणे दंगे थांबतील असा त्याचा युक्तिवाद आहे. त्याने पुन्हा काश्मीर व दंगे यांचा संबंध जोडला आहे. वस्तुत: दंगे होतात ते पाकिस्तानच्या जातीय धोरणामुळे; जातीय भावनांना चिथावणी दिल्यामुळे. ही चिथावणी पाकिस्तान देत आहे. व हे सिध्द करणारा पुष्कळ पुरावा मी माझ्या भाषणात, सुरुवातीला दिला आहे.

सुरक्षितता मंडळाचा इतका वेळ घेण्याची पाळी माझ्यावर आली नसती व आमच्यावर पाकिस्तानच्या परराष्ट्रमंत्र्यांनी जे अनेक आरोप केले आहेत त्यांचे खंडन करण्याची आवश्यकता निर्माण झाली नसती तर मला फार बरे वाटले असते. सुरक्षितता मंडळात वारंवार दोषारोप करण्याचा फायदा होत नाही. ते दोषारोप जर फलद्रूप झाले असते तर आज इतक्या वर्षांनी आपण येथे आलो नसतो. पाकिस्तानने आमच्यावर गंभीर स्वरूपाचे व निराधार आरोप केले असल्यामुळे त्यांचे जोरदार खंडन करणे भाग आहे. सन्माननीय अध्यक्षांना व सुरक्षितता मंडळाला मी असे आश्वासन देऊ इच्छितो की प्रक्षोभक कृत्ये घडली असताना सुध्दा, पाकिस्तानबरोबरचे संबंध सुधारण्यासाठी आम्ही यापुढेही सतत कार्य करीत राहू. आम्हाला, परस्परांवर आरोप करून, द्वेषभावावर आधारलेले संबंध निर्माण करायचे नाहीत तर सहकार्य, मित्रभाव, व परस्परांविषयी आदरभाव, यांच्यावर आधारलेले संबंध स्थापन करायचे आहेत. माझ्या सरकारच्या व भारतीय लोकांच्या वतीने मला हे नि:संदिग्ध शब्दात सांगायचे आहे की एक स्वतंत्र व सार्वभौम राष्ट्र या नात्याने, पाकिस्तान समृध्दसंपन्न व्हावे अशी आमची इच्छा असून, समता, व सार्वभौमत्व यांच्यावर आधारलेल्या दोन शेजारी मित्र देशांमधील संबंधासारखे संबंध आम्हाला पाकिस्तानबरोबर स्थापन करायचे आहेत.

आजची दु:खदायक परिस्थिती बदलण्यासाठी आणि भारत व पाकिस्तान यांच्यातील संबंध सुधारण्यासाठी कोणते उपाय योजावे असा प्रश्न तुम्ही

कदाचित विचाराल. दोन्ही देशामधील लोकाना, परस्परांचा मित्रभाव संपादन करण्याची इच्छा आहे, याविषयी माझ्या मनात तिळमात्र शंका नाही. सोळा वर्षांपूर्वी हे लोक एकाच देशाचे घटक होते. त्यांची परंपरा, त्यांचा इतिहास एकच होता व आज सुध्दा या दोन देशामधील लोकांचे नात्याचे संबंध आहेत. पाकिस्तान सरकारने, आपली आजची भूमिका सोडून दिली व समजसपणा दाखवला तर माझेहि सरकार योग्य उपाय योजून सद्भावनेचे व मैत्रीचे वातावरण निर्माण करायला सक्रीय हातभार लावील. अत्यंत आदरपूर्वक मी असे सुचवू इच्छितो की केवळ ठराव मंजूर करण्याचा काहीही उपयोग होणार नाही. उलट त्यामुळे भावना प्रक्षुब्ध होण्याचाच संभव राहील. कोणताही ठराव मग त्याचा मसुदा कितीही चांगला असो, दोन्ही देशाचे समाधान करू शकणार नाही. जर कशाची आवश्यकता असेल तर ती कृतीची. जी गोष्ट सर्वांत महत्त्वाची आहे, ती सर्वांत अगोदर करण्यात आली पाहिजे, हे आपण विसरता कामा नये.

## पाकिस्तानने धमक्या देणे बंद केले पाहिजे

म्हणून पहिली गोष्ट म्हणजे भारत व पाकिस्तान यांच्या दंगलग्रस्त भागात, पूर्ववत शांतता व सुव्यवस्था स्थापन करून दोन्ही देशामध्ये, जातीय सलोख्याचे व बंधुत्वाचे वातावरण निर्माण करण्यात आले पाहिजे. यासाठी पाकिस्तानच्या सहकार्याने आम्ही कोणतेही उपाय योजायला तयार आहोत. त्यांचा विचार करण्यासाठी, उभय देशांच्या मंत्र्यांची बैठक भरवण्याचे माझे सरकार स्वागत करील. अलीकडेच, जे लाजिरवाणे प्रकार घडले ते पुन्हा कधीही घडणार नाहीत अशी खबरदारी आपण घेतली पाहिजे. कोणत्याही सुसंस्कृत देशाच्या सरकारच्या दृष्टीने, हे प्रकार लाच्छनास्पद आहेत.

दुसरी गोष्ट अशी की पाकिस्तान वेळोवेळी ज्या धमक्या देत आला आहे, त्या देण्याचे त्याने थांबवले पाहिजे. हे दोन देश परस्पराशी कधीही युध्द करणार नाहीत व आपसातील सर्व मतभेद ते शांततेने सोडवतील

अशी सुस्पष्ट घोषणा पाकिस्तानने, भारताप्रमाणे निःसंदिग्ध शब्दात करावी. या संबंधात श्री० क्रुश्चॉफ यांनी जे विनंतीपत्रक नुकतेच काढले आहे, त्याचे आम्ही स्वागत करतो. प्रदेशासंबंधीचे तंटे शांततेने मिटवण्यात यावे अशी जी विनंती त्यांनी केली आहे, तिला आमच्या पंतप्रधानांनी हार्दिक पाठिंबा दिला हे आपल्यास माहीत आहेच. लष्करी सामर्थ्याचा उपयोग कोणीही करू नये, याचे अध्यक्ष जॉन्सन यांनीही तत्वतः स्वागत केले आहे. एकदा वातावरण सुधारले म्हणजे मग, पाकिस्तानबरोबरच्या सर्व विवाद्य प्रश्नांची चर्चा करणे शक्य होईल व ती करायला आम्ही तयार आहोत. चर्चा व वाटाघाटी करण्यावर आमची श्रद्धा आहे व आमचे मतभेद मिटवण्यासाठी पाकिस्ताननेही तसेच केले तर आम्हाला अत्यंत आनंद होईल. या दोन देशांमधील संबंध नेहमी मैत्रीचे राहावेत, अशी आमची उत्कट इच्छा आहे. याची पाकिस्तानने नेहमी जाणीव बाळगावी, अशी माझी विनंती आहे. उभय देशांमधील संबंध सलोख्याचे राहाण्यावरच, दोन्ही देशांची भावी समृध्दी अवलंबून आहे

---

## १० फेब्रुवारी १९६४ रोजी श्री० चागला यांनी केलेले भाषण

पाकिस्तानच्या परराष्ट्रमंत्र्याचे निवेदन ऐकून मला राग येण्याऐवजी दुःखच अधिक झाले. राग आवरता येतो. पण दुःख आवरणे कठीण आहे. माझ्या देशाची व सरकारची बदनामी करणाऱ्या व स्वातंत्र्यानंतर शांततेसाठी व प्रगतीसाठी त्याने जे कार्य केले त्याला काळीमा फासणाऱ्या भावना त्यांनी व्यक्त कराव्यात, हे पाहून मला दुःख होते. जो देश परवा परवापर्यंत भारतीय उपखंडातच मोडत होता, त्या देशाशी व त्या देशातील लोकांशी शांततेचे व सलोख्याचे संबंध स्थापन करावे

अशी माझ्या देशाची एकमेव इच्छा असून, त्या देशाने अशा भावना व्यक्त कराव्यात याच मला विशेष दुःख होते. पाकिस्तानच्या परराष्ट्रमंत्र्यांचे अनुकरण करण्याचा माझा विचार नाही. लांबलचक भाषण करून, सुरक्षितता मंडळाच्या सभासदांच्या सहनशीलतेची परीक्षा घेण्याची माझी इच्छा नाही. त्यांच्या सहनशीलतेवर अगोदरच पुरेसा ताण पडला आहे. म्हणून मी माझ्या पूर्वीच्या निवेदनात जे काही सांगितले त्याचा पुनरुच्चार करणे, म्हणजे कालापव्यय होईल, असे मला वाटते. मी जे काही सांगितले ते कागदोपत्री नमूद करण्यात आलेले आहे व ते स्पष्ट आहे माझ्या देशाची भूमिका त्यात पूर्णपणे स्पष्ट करण्यात आली असून, मी जे काही म्हणालो आहे, त्यापासून मी तकिंचितही माघार घेणार नाही.

सुरक्षितता मंडळाकडे मागणी करण्याच्या आपल्या भूमिकेचे समर्थन करण्याचा एकच मार्ग आहे व तो म्हणजे काश्मीरमध्ये उपद्रव होऊन बेबंदशाही निर्माण झाली आहे किंवा पाकिस्तानच्या प्रतिनिधींच्या सुरुवातीच्या निवेदनामधील शब्दप्रयोग वापरायचा म्हणजे, "काश्मीरने भारताविरुद्ध उघड बंड पुकारले आहे" असे सिद्ध करणे याची पाकिस्तानच्या प्रतिनिधींना जाणीव झाली आहे. काश्मीरमध्ये जातीय दंगे झाले नाहीत, उलट तेथे पूर्ण जातीय सलोखाच नांदत आला आहे, ही सत्यस्थिती आहे. काश्मीरने भारताविरुध्द बंड पुकारण्याऐवजी, पवित्र केसाच्या चोरीचा हा दुर्दैवी प्रकार घडला तेव्हा प्रत्येक घटकेला, काश्मीरने भारताचीच मदत व पाठींबा मागितला असे सिध्द झाले तर सुरक्षितता मंडळाकडे पाकिस्तानने ही जी मागणी केली आहे ती समर्थनीय ठरेल असा-कोणताही बदल काश्मीरमध्ये घडून आलेला नाही ही गोष्ट स्पष्ट होईल. अर्थात काश्मीरमध्ये दंगल माजली तर पाकिस्तानने हस्तक्षेप करणे समर्थनीय ठरेल असातला मुळीच भाग नाही. कारण, काश्मीरमधील कोणतीही घटना ही सर्वस्वी, भारताची अंतर्गत बाब आहे, हे आम्ही अनेक वेळा स्पष्ट केलेले आहे. काश्मीरमध्ये अलीकडे 'स्वयं-

स्फूर्त सार्वमत' झाले, असे अध्यक्ष अयूबखान यांनी म्हटल्याचे पाकिस्तानच्या परराष्ट्रमंत्र्यांनी सांगितले. ते किती बरोबर आहे ते पहा. या सार्वमता नंतर काश्मीरी जनतेने जर कोणता स्पष्ट कौल दिला असेल तर तो हा की त्या लोकांचा स्थानिक प्रशासनाला विरोध असला तरी भारत सरकारच्या निःपक्षपातीपणावर व न्यायप्रियतेवर त्यांचा पूर्ण विश्वास आहे. काश्मीरमधील लोकांना चिथावणी देऊन जातीय भावना प्रक्षुब्ध करणाऱ्या, पाकिस्तानातील जबाबदार पुढाऱ्यांची वक्तव्ये मी माझ्या अगोदरच्या निवेदनात उद्धृत केली. पवित्र केसाच्या चोरीमुळे, काश्मीरमध्ये रक्तपात होईल व तेथील मुसलमान लोक, हिंदू व शीख यांच्या विरुद्ध उठतील अशी पाकिस्तानची अपेक्षा होती असे मी म्हणालो होतो. तेच मी पुन्हा सांगू इच्छितो. येथे मुद्दा पाकिस्तानच्या परराष्ट्रमंत्र्यांनी असे सांगितले की अगदी या क्षणाला श्रीनगरमध्ये रक्तपात होतो आहे. हे एक सत्यस्थिती दर्शक निवेदन आहे की पाकिस्तानच्या इच्छा आणि आशा व्यक्त करणारे निवेदन आहे असा माझा सवाल आहे. मंडळाच्या सभासदांना मला निःसदिग्ध शब्दात असे सांगायचे आहे की आज काश्मीरमध्ये कसलाही उपद्रव नाही. पवित्र केस सापडला आहे व त्याहीपेक्षा जास्त म्हणजे सरकारला केवळ पाठिंबा न देणाऱ्या नव्हे तर त्याला विरोध करणाऱ्या मौलाना एम० मसूदी यांच्यासारख्या श्रीनगरमधील प्रतिष्ठित धार्मिक पुढाऱ्यांनी तो महमदाचा खरा केस असल्याचे जाहीर केले आहे.

## काश्मीरची मागणी करण्यामागील पाकिस्तानचे हेतू

काश्मीरचा प्रश्न अत्यंत महत्त्वाचा आहे, असे आपल्याला सांगण्यात आले आहे. हा प्रश्न कोणाच्या दृष्टीने महत्त्वाचा आहे ? काश्मीरमधील लोकांच्या की पाकिस्तानमधील लोकांच्या दृष्टीने ? अध्यक्ष अयुबखान यांनी बरेच वेळा असे सांगितले की पाकिस्तानच्या अर्थव्यवस्थेच्या व संरक्षणाच्या दृष्टीने काश्मीर अत्यंत महत्त्वाचा आहे त्यांचे शब्द उद्धृत करायचे म्हणजे—"केवळ राजकीय दृष्ट्याच नव्हे तर लष्करी दृष्ट्यादेखील काश्मीर

पाकिस्तानच्या दृष्टीने अत्यंत महत्त्वाचा आहे. काश्मीर हा आमच्या जीवनमरणाचा प्रश्न आहे" असे अध्यक्ष अयूबखान डिसेंबर, १९५९ मध्ये, म्हणाले होते.

१३ जुलै, १९६१ रोजी वॉशिंग्टनमध्ये, नॅशनल प्रेस क्लबने दिलेल्या मेजवानीच्या वेळी अध्यक्ष अयबखान यांनी जे भाषण केले व दुसऱ्या दिवशी पाकिस्तान टाइम्स मध्ये त्याचा जो मजकूर प्रसिध्द झाला त्यातील काही भाग मी येथे उद्धृत करतो.

"तुम्ही म्हणाल, काश्मीरचा प्रश्न तुम्ही सोडून का देऊ शकत नाही? आम्हाला रक्तपात हवा आहे म्हणून आम्ही तो सोडून देऊ शकत नाही असे म्हणणे बरोबर नाही. परंतु···उदाहरणार्थ काश्मीरचा आमच्या सुरक्षिततेशी संबंध आहे या कारणास्तव आम्ही तो सोडून देऊ शकत नाही पाकिस्तानमधील तीन कोटी २० लाख एकर जमिनीला ज्या नद्यांचे पाणी मिळते त्यांचा उगम काश्मीरमध्ये होतो."

पाकिस्तानच्या अध्यक्षांनी म्हटले:

"आमच्या लष्करी सुरक्षिततेसाठीच नव्हे तर आर्थिक सुरक्षिततेसाठी सुध्दा काश्मीर आमच्या दृष्टीने महत्त्वाचे आहे."

आणखी एक उतारा :

"काश्मीर हा पाकिस्तानच्या जीवनमरणाचा प्रश्न आहे व हा प्रश्न सुटल्याशिवाय आम्हाला आमच्या प्रदेशाविषयी विशेषत: आमच्या देशाच्या पश्चिम भागाविषयी सुरक्षितता वाटणार नाही असे पाकिस्तानच्या अध्यक्षांनी जाहीर केले."

अध्यक्ष अयुबखान यांनी १८ ऑक्टोबर, १९६१ रोजी ढाक्क्यामध्ये हे निवेदन केले व १९ ऑक्टोबर रोजी ते 'पाकिस्तान टाइम्स' मध्ये प्रसिध्द झाले.

पाकिस्तानचे बिंग फुटले. मानवतावादी कारणास्तव काश्मीरचा प्रश्न पाकिस्तानला महत्त्वाचा वाटत नाही तर त्याची स्वत:ची सुरक्षितता व संरक्षण या दृष्टीने त्याला तो महत्त्वाचा वाटतो.

पाकिस्तानचे संस्थापक श्री० जिना एकदा जे म्हणाले होते, त्याचाही यावरून खुलासा होतो. "मी जे पाकिस्तान मिळवले आहे, त्यामुळे माझे समाधान झालेले नाही. कारण हे तुकडे झालेले पाकिस्तान आहे." तेव्हा पाकिस्तान काश्मीरचा प्रश्न सुरक्षितता मंडळासमोर सतत हिरीरीने मांडीत आला आहे याचे कारण, त्याला मानवी हक्कांची चाड आहे, हे नाही. खरी गोष्ट अशी आहे की काश्मीरमध्ये मुसलमान बहुसंख्येने आहेत म्हणून तो पाकिस्तानचाच भाग बनला पाहिजे, या आपल्या द्विराष्ट्रवादाच्या समर्थनार्थ पाकिस्तानला काश्मीर हवे आहे. आपल्याला केवळ काश्मीर-मधील लोकांचाच, त्यांच्या हक्कांचा, त्यांच्या सुरक्षिततेचा, शांततेने राहण्याच्या त्यांच्या इच्छेचा विचार करायचा असेल तर कधीही न संपणारा हा वाद थांबवण्यात आला पाहिजे. पाकिस्तान सार्वमताची भाषा बोलतो. त्याचे काय परिणाम होतील, याची त्याला जाणीव आहे काय ? शांतता भंग होऊन कदाचित रक्तपात होईल. पवित्र केसाच्या चोरीच्या प्रकाराचा गैरफायदा घेऊन, दीड हजार मैलांवर जर दंगे घडवून आणता येऊ शकतात तर मग, मोठ्या प्रमाणावर जातीय भावना चेतवल्याने भारतात व पाकिस्तानात गंभीर स्वरूपाचे दंगे होतील व लोक स्थलांतर करतील, हे काय सांगायला हवे. त्यामुळे, हालअपेष्टा जर कोणाला सोसाव्या लागतील तर त्या 'जिहाद' चा प्रचार करणाऱ्या पाकिस्तानमधील राजकीय पुढाऱ्यांना नव्हे तर राजकारणाविषयी अजिबात आस्था वाटत नसलेल्या व आपले नित्यव्यवसाय शांतपणे व सुरळीतपणे करू इच्छिणाऱ्या लक्षावधी निरपराध लोकांना. म्हणून आपण केवळ शांतता कायम राखण्याचा, व प्रत्येक मानवाविषयी आदर बाळगण्याच्या दृष्टिकोनातून विचार करणार असला तर भारत स्वतंत्र झाल्यापासून निर्माण झालेली परिस्थिती बिघडवण्यापूर्वी आपण हजारदा विचार करायला हवा.

## पाकिस्तानची सुरक्षितता मंडळाला धमकी

पाकिस्तानच्या परराष्ट्रमंत्र्यांच्या भाषणाचे सार हेच आहे की ज्या एका गोष्टीमुळे भारत व पाकिस्तान यांच्यातील संबंध विषारी झाले

आहेत ती गोष्ट म्हणजे काश्मीर. व काश्मीरचा प्रश्न जर सोडवला नाही तर या दोन देशांमधील संबंध सुधारणार नाहीत व जातीय दंगे चालू राहतील. माझ्या मते, सुरक्षितता मंडळाला उघड उघड दिलेली ही धमकी आहे. अध्यक्ष महाराज, पाकिस्तान दमदाटी करून व कडक शब्दात धमकी देऊन आपल्याला असे सांगत आहेत की काश्मीरचा प्रश्न सुटला नाही तर रक्तपात व युध्द होईल या धमकीसमोर व दमदाटीसमोर कोणी नमते घेईल काय ?

आत एक, बाहेर एक, अशी त्याची कपटी वृत्ती आहे पाकिस्तानच्या प्रतिनिधींनी श्री० ग्रुश्चॉफ व अध्यक्ष जॉन्सन यांच्या निवेदनातील उतारे उद्धृत केले आहेत व प्रादेशिक तंटे शांततेने सोडवण्या बाबत त्यांनी जे काही म्हटले आहे, त्याचा आधार घेतला आहे. सैतान सुद्धा आपला कार्यभाग साधण्यासाठी धर्मशास्त्रातील वचनांचा आधार घेऊ शकतो. श्री० ग्रुश्चॉफ यांनी जे अत्यंत उदात्त विचार व्यक्त केले, त्यांना भारताच्या पतप्रधानांनी पूर्णपणे पाठिंबा दिला व अध्यक्ष जॉन्सन यांनीही त्यांना प्रतिसाद दिला. एकीकडे शांततेची भाषा बोलणाऱ्या व दुसरीकडे तलवार परजणाऱ्या एका देशाने या अत्यंत उदात्त विचारांचा जो कमालीचा विपर्यस्त अर्थ लावला आहे, त्याहून अधिक विपर्यास कोणी करू शकेल असे मला वाटत नाही. विपर्यास करण्याची ही परमावधी आहे.

श्री० ग्रुश्चॉफ यांनी केलेल्या विनंतीचा पाकिस्तानच्या परराष्ट्रमंत्र्यांनी आधार घेतल्यामुळे तर, भारताशी युध्द न करण्याच्या संयुक्त घोषणा पत्रकावर सही करायला नकार देण्याची त्याची भूमिका अधिकच अनाकलनीय होते. हे विचार संयुक्त राष्ट्रसंघटनेच्या सनदेत अंतर्भूत करण्यात आले आहेत हे खरे असले तरी त्याचे वारंवार स्मरण करून देण्याची व त्याचा पुनरुच्चार करण्याची आवश्यकता आहे. माझ्या सरकार-च्या वतीने मला असे जाहीर करायचे आहे की पाकिस्तानबरोबरचे मतभेद मिटवण्यासाठी, भारत, कोणत्याही परिस्थितीत युध्दाचा अवलंब करणार नाही. मी हे पुन्हा सांगतो की पाकिस्तानबरोबरचे मतभेद मिटवण्यासाठी,

भारत कोणत्याही परिस्थितीत युद्धाचा अवलंब करणार नाही. पाकिस्तानचे परराष्ट्रमंत्री असेच निवेदन करतील काय ?

पाकिस्तानला शांतता हवी आहे, हे खरे आहे. परंतु ती शांतता, त्याला संगिनी रोखून व त्याच्या अटीवर हवी आहे. भारताविरुद्ध हिंसेचा अवलंब केला जाईल अशा धमक्या देणाऱ्या पाकिस्तानातील जबाबदार पुढाऱ्यांच्या निवेदनांचे खंडन, पाकिस्तानच्या प्रतिनिधीने या केले नाही ? मी पूर्वी सांगितल्याप्रमाणे, सुरक्षितता मंडळाला पाठविलेल्या १६ जानेवारीच्या आपल्या पत्रात सुध्दा त्यांनी हिंसेचा अवलंब करण्याची धमकी दिली आहे व ती सुध्दा, ध्वनित नव्हे तर उघड उघड.

## काश्मीर अनादिकालापासून भारताचाच एक भाग

काश्मीर भारताच्या 'वसाहतशाही राजवटी' खाली आहे, असे, भारताची बदनामी करणारे विधान, पाकिस्तानच्या परराष्ट्रमंत्र्यानी अनेक वेळा केले आहे. काश्मीर भारताचा भाग बनला तो काही, हा प्रदेश भारताने जिंकला म्हणून नव्हे. तसेच, एका वंशाच्या लोकानी दुसऱ्या वंशाच्या लोकावर सत्ता गाजवण्याचाही येथे प्रश्न नाही. काश्मीर अनादिकालापासून भारताचाच भाग राहिला आहे. आणि काश्मीरी व भारतीय लोक हे मानववंश-*शास्त्राच्या दृष्टीने, एकाच वंशाचे लोक आहेत. भारताच्या त्या भागात,* मुसलमान मोठ्या बहुसंख्येने असले तरी भारतातील ५ कोटी मुसलमान ज्या धर्माचे पालन करतात त्याचेच तेही पालन करतात. पाकिस्तान व भारत यांच्यातील मूलभूत फरक जर कोठे असेल तर तो येथेच. काश्मीर-*मधील लोकांना जोडणारे जे नाते पाकिस्तानला आवडते व ज्या नात्यामुळे,* काश्मीरमधील लोक आपले बांधव आहेत असे पाकिस्तानचे प्रतिनिधी म्हणतात ते नाते सामाईक राष्ट्रीयत्वाचे नाते नाही, ते सामाईक वंशाचे किंवा सामाईक इतिहासाचे व परंपरेचेही नाते नाही तर केवळ धर्माचे नाते आहे. राष्ट्रीयत्व आणि धर्म याची सांगड घालून त्यांना समान लेखणाऱ्या विचारसरणीचा आम्ही ठामपणे निषेध करतो, तिचा धिक्कार

करतो. आमच्या राष्ट्राची व राज्यघटनेची उभारणी ज्या तत्वज्ञानावर व सिध्दांतावर करण्यात आली आहे तो सिध्दांत म्हणजे बहुविध वंशांचे लोक खेळीमेळीने व सुखासमाधानाने राहातील व कायद्याच्या दृष्टीने सर्व लोक समान असतील व सर्वांना समान हक्क व संधी दिली जाईल, अशी समाजरचना निर्माण करणे.

## अल्पसंख्य लोकांविषयीची भूमिका—पाकिस्तानातील विरोधी दृश्य

भारतात मुसलमान लोकांना मिळत असलेल्या वागणुकीबद्दल व वारंवार जातीय दंगे होत असल्याबद्दल पाकिस्तानच्या परराष्ट्रमंत्र्यांनी अत्यंत उद्वेग व्यक्त केला आहे. मुसलमानांच्या प्रत्येक सणाच्या वेळी, त्यांच्यावर हल्ले केले जातात, असे म्हणणे हा सत्याचा धडधडीत विपर्यास आहे. इतक्या भरमसाट चुकीच्या विधानांचा आधार घ्यावा लागणे इतकी लंगडी व दुबळी बाजू पाकिस्तानची आहे का ? इतर जमातींच्या लोकांबरोबरच, मुसलमान लोकही वेळोवेळी आपले सण मोठ्या आनंदाने साजरे करतात मुसलमानांच्या पवित्र ठिकाणी मेळे व जत्रा भरतात, व त्यावेळी लक्षावधी हिंदु व मुसलमान जमून सत्पुरुषाविषयीचा आपला आदर प्रगट करतात. मी सांगितलेच आहे की अगदी अलीकडेच काश्मीरमध्ये सुध्दा, पवित्र केसाच्या चोरीबद्दल केवळ मुसलमानांनीच नव्हे तर त्यांच्याबरोबर हिंदू व शीख या लोकांनीही दुःख व्यक्त केले व तो जेव्हा सापडला तेव्हा, केवळ मुसलमानांनाच नव्हे तर काश्मीरमध्ये व भारताच्या उरलेल्या भागात सर्वत्र सर्वच जमातींच्या लोकांना आनंद झाला या उलट, पाकिस्तानमध्ये मात्र आनंदोत्सव झाला नाही. उलट सापडलेला केस बनावट आहे, असे तेथे सांगण्यात आले. भारताविषयी आणखी द्वेष निर्माण करण्यासाठी बहुधा असे करण्यात आले असावे. पाकिस्तानची मनोवृत्ती व त्याचा पिंड असा आहे की हिंदू व मुसलमान, शांततेने व सलोख्याने शेजारी म्हणून राहू शकतात, ही गोष्ट तोसमजूच शकत नाही.

भारतातील जातीय दंग्यांचे भयानक चित्र पाकिस्तानच्या परराष्ट्रमंत्र्यांनी रेखाटले आहे. त्यांनी ५५० हा आकडा दिला आहे. ही धडधडीत

अतिशयोक्ती आहे. येथे मला असे म्हणावेसे वाटते की ब्रिटिशांच्या अमदानीत, संपूर्ण भारतीय उपखंडात, जे जातीय दंगे होत असत, त्यांचा अनिष्ट वारसा चालत आला आहे. दोन्ही देशांना फरम वाटावी अशी ती अवस्था होती. परंतु भारत स्वतंत्र झाल्यानंतर, निरनिराळ्या जमातींच्या लोकांमध्ये परस्पराविषयी विश्वास निर्माण करून जातीय दंगे ही एक इतिहासजमा गोष्ट व्हावी हे भारताचे धोरण राहिलेले आहे. पाकिस्तानने काही आकडेवार माहिती दिल्यामुळे मी सुध्दा मंडळाला काही आकडेवार माहिती सादर करू इच्छितो. ? १९५० ते ५६ एवढ्याच काळात, पूर्व पाकिस्तानात, जातीय दंगलीचे ८ हजार २१ प्रकार घडले. व अल्पसंख्य जमातीचे लोक त्यात बळी पडले. हे प्रकार पूर्व पाकिस्तान सरकारच्या निदर्शनास आणून दिले. अर्थात १९५६ नंतर, आणखी असे शेकडो प्रकार घडले. दंगे, मग ते पाकिस्तानात होवो अथवा भारतात होवो, आम्ही त्यांचा धिःकार करतो. निरपराध लोकांची कत्तल झाल्याबद्दल आम्हाला वाईट वाटते व असे दंगे होऊ नयेत यासाठी आम्ही पराकाष्ठेचे प्रयत्न करतो.

याही बाबतीत भारत व पाकिस्तान यांची भूमिका परस्पर विरोधी आहे. मी पूर्वी सांगितल्याप्रमाणे, जातीय दंग्यांना चिथावणी देणे, हे पाकिस्तानच्या धोरणाचे एक अंग आहे. पाकिस्तानच्या प्रतिनिधींनी हिंदु महासभेच्या सभासदांची काही निवेदने उद्धृत केली आहेत. हिंदुमहासभा हा भारतातील जातीय पक्ष आहे. भारतीय संसदेतील ५०० सभासदांमध्ये, या पक्षाचा फक्त एक सभासद आहे. यावरून या पक्षाला लोकांचा किती पाठिंबा आहे, हे स्पष्ट होते. आज भारतीय राष्ट्रीय काँग्रेस हा पक्ष सत्तारूढ असून, त्या जातीय पक्षाच्या विचारसरणीला काँग्रेसचा तीव्र विरोध आहे. भारतीय राष्ट्रीय काँग्रेसचे पुढारी किंवा भारत सरकारचे अधिकारी, भारतातील हिंदूंना मुसलमानावर हल्ले करायची चिथावणी देतात असे पाकिस्तानचे परराष्ट्र मंत्री म्हणत नाही, तसे ते म्हणूच शकत नाही. अशी चिथावणी देणे, भारतीय राष्ट्रीय काँग्रेसच्या मूलभूत धोरणाविरुध्द आहे, हिंदु-मुस्लीम ऐक्यासाठी गांधीजींनी आपले प्राण वेचले आणि पाकिस्तानने

कितीही प्रक्षोभक कृत्ये केली असली तरी भारताचे नेतृत्व करणाऱ्या व त्याला स्वातंत्र्य मिळवून देणाऱ्या या पक्षाने, नेहमी जातीय सलोखा स्थापन करण्याचाच प्रचार व प्रयत्न केला आहे. भारतात एकही मुसलमान असा नाही की जो आमच्या पंतप्रधानांना, आपला खरा मित्र मानीत नाही.

भारतातील परिस्थितीचे नि:पक्षपातीपणे अवलोकन केलेल्या एका उच्चपदस्थ व्यक्तीचे निवेदन मी उद्धृत करतो. या व्यक्तीचे निवेदन महत्त्वपूर्ण नाही, असे पाकिस्तानला सुद्धा म्हणता येणार नाही. ती व्यक्ती म्हणजे सौदी अरबस्तानचे राजे सौद. भारतातील मुक्कामाच्या शेवटी ते काय म्हणाले याकडे मी मंडळाचे लक्ष वेधू इच्छितो :—

'मी या थोर भूमीवर—म्हणजे भारताच्या भूमीवर, पाय ठेवला तेव्हा माझ्या समोर दोन प्रश्न उभे राहिले. ते असे. भारतातील मुसलमानांचे भवितव्य व ब्रिटिश सत्ता संपुष्टात आल्यानंतरची सर्वसाधारण प्रशासन व्यवस्था. भारतातील मुक्काम आटोपल्यानंतर मला आता संपूर्ण जगातील माझ्या मुसलमान बांधवांना अधिक संतोषाने असे सांगावेसे वाटते की भारतातील मुसलमानांचे भवितव्य अगदी सुरक्षित आहे. मी ज्या ज्या मुसलमान पुढाऱ्यांना भेटलो, त्या सर्वांनीही माझ्या या मताला पुष्टी दिली" नि:पक्षपाती अभिप्रायाचे आणखी एक उदाहरण पहा. पक्षपाताला प्रतिबंध व अल्पसंख्य जमातींचे संरक्षण करण्याविषयीच्या संयुक्त राष्ट्रांच्या उप मंडळाच्या कागदपत्रातील—संयुक्त राष्ट्रांच्या अधिकृत कागदपत्रातील हा उतारा आहे.

'"११ जानेवारी, १९५९ रोजी संयुक्त राष्ट्रांच्या उपमंडळाच्या बैठकीत चर्चा करताना, ब्रिटनचे श्री० रिचर्ड हिस्कॉक्स म्हणाले की भारताचे, महात्मा गांधी व श्री नेहरू हे दोघे थोर जागतिक पुढारी असून लोकमताचे [illegible] जाण्याचे आणि अस्पृश्य व अल्पसंख्य जमातींचे संवर्ध । दृष्टिकोनात क्रांती घडवून आणण्याचे धैर्य दाखवत

होते. विशेषतः गेल्या दहा वर्षांत अल्पसंख्य जमातीविरुध्द पक्षपात केला जाण्याला प्रतिबंध करणारे कायदे करण्यात श्री० नेहरूंनी पुढाकार घेतला. इतर देशातील पुढाऱ्यामध्ये उदाहरणार्थ, पाकिस्तानातील पुढाऱ्यामध्ये, भारतीय पुढाऱ्याचे अनुकरण करण्याचे धैर्य असेल का, या विषयी मला शंकाच आहे.

"चिलीचे सेनॉर हर्मन सांताक्रूझ म्हणाले की ते अलीकडेच भारतात गेले होते. व अल्पसंख्य जमातींविषयी सहिष्णुता वाढीला लावण्याबाबत व या जमातींचा दृष्टिकोन समंजसपणे माहीत करून घेण्याबाबत, श्री० नेहरूंनी व भारतीय संसदेने, उल्लेखनीय कामगिरी बजावली आहे."

आता वृत्तपत्रांकडे पहा. इतर कोणत्याही देशाप्रमाणे, आमच्याही देशात, काही बेजबाबदार वर्तमानपत्रें सुध्दा आहेत. परंतु सरकारने नेहमी संयम राखण्याची विनंती केलेली आहे व भारतीय वर्तमानपत्रांनी आपली मते व्यक्त करताना, व पूर्व पाकिस्तानमधील भीषण घटनांचे विवेचन करताना जो संयम दाखवला तो प्रशंसनीय आहे व शांतता आणि सुव्यवस्था राखण्याच्या कामी त्यांनी भारत सरकारला जी मदत केली ती भूषणास्पद आहे, हे सांगताना मला आनंद होतो. आमच्या देशात वृत्तपत्रांना स्वातंत्र्य आहे व ज्यांना वृत्तपत्र स्वातंत्र्य म्हणजे काय, हे माहीत आहे, त्यांना वर्तमानपत्रांना संयम राखायला लावणे किती कठीण आहे, याची कल्पना आहे. परंतु पाकिस्तानात म्हणजे जेथे वर्तमानपत्रांवर नियंत्रण आहे तेथे, महत्त्वाच्या वर्तमानपत्रांनी; सरकारचा पाठिंबा असलेल्या वर्तमानपत्रांनी भारताविरुध्द जोरात मोहीम सुरू केली आहे. भारत व हिंदू यांच्याविषयी द्वेष पसरवला जात नाही असा एकही दिवस जात नाही. पाकिस्तानातील वर्तमानपत्रात अलीकडेच जो मजकूर प्रसिध्द झाला त्याचे काही नमुने पहा. कराचीच्या 'हुरियत' या उर्दू वर्तमानपत्राच्या ४ फेब्रुवारी १९६४ च्या अंकात जो मजकूर प्रसिध्द झाला तो असा आहे :—

"काश्मीर पेटले आहे. भारतात भारतीय मुसलमानांच्या रक्ताच्या नद्या वाहात आहेत व मुसलमान स्त्रियांची अब्रू घेतली जात आहे."

अशा विधानाचा, भारत व पाकिस्तान या दोन्ही देशातील मुसलमाना-च्या मनावर काय परिणाम होईल याची कोणालाही कल्पना करता येईल. भावना प्रक्षुब्ध करणारे व लोकांना चिथवणारे जर कोणते निवेदन असेल तर ते हेच आहे. काश्मीरचा भडका उडाला आहे, मुसलमानांच्या रक्ताच्या नद्या वाहात आहेत व मुसलमान स्त्रियांची अब्रू घेतली जात आहे असे चित्र ते रेखाटत आहेत. याला चिथावणी देणे म्हणायचे नाही तर मग कशाला म्हणायचे, हे मला माहीत नाही.

आता मी पाकिस्तान सरकारचा आशीर्वाद असलेल्या कराचीच्या 'डॉन' वर्तमानपत्राच्या १ जानेवारी १९६४ च्या अंकातील मजकूर उद्धृत करतो :—

"त्यांनी ( म्हणजे पश्चिम पाकिस्तानातील लोकांनी ) भारतातील व पाकिस्तानातील मुसलमानांना, या प्रश्नावरून जिहाद पुकारण्याचा व त्या देशातील मुसलमानांची पवित्र स्थळे आणखी भ्रष्ट होऊ न देण्याचा आदेश दिला आहे."

मुसलमानांचे कोणते पवित्र स्थान भ्रष्ट करण्यात आले आहे, हे पाकिस्तानचे परराष्ट्र मंत्री मला सांगतील काय ?

याच 'डॉन' च्या १७ जानेवारी, १९६४ च्या अंकातील मजकूर पहा :—

"अध्यक्ष, सरदार महमद अलम खान यानी मुस्लीम कॉन्फरन्सच्या पदाधिकाऱ्यांना जिहादसाठी रझाकार ( म्हणजे धर्मवेडे ) भरती करायला व दुसऱ्या आदेशाची वाट पाहायला सांगितले."

हा भरती करण्याचा हुकूम आहे व युद्धाची घोषणा आहे. ते आता काश्मीरवर चाल करून जाण्याच्या योग्य संधीची केवळ वाट पहात आहेत.

पाकिस्तान सरकारने आपल्या देशातील अल्पसंख्य जमातीच्या लोकांना ज्या रीतीने वागवले आहे, त्याबद्दल पाकिस्तानच्या परराष्ट्रमंत्र्यांना अभिमान वाटतो. अल्पसंख्य जमातीच्या लोकांना वागवण्याच्या अनेक रीती आहेत. व पाकिस्तान ज्या रीतीने वागवत आहे ती बहुधा सर्वात प्रभावी रीत आहे. मूठभर हिंदूखेरीज सर्व हिंदूंना त्याने पश्चिम पाकिस्तानमधून हाकलून लावले आहे व हळूहळू पूर्व पाकिस्तानातील हिंदूंची हकालपट्टी करण्याचे धोरण तो अनुसरीत आहे. केवळ एकाच धर्माचे लोक असलेले राष्ट्र निर्माण करणे, हे जर पाकिस्तानच्या धोरणाचे उद्दिष्ट असेल तर ते साध्य करण्याचा, पाकिस्तानच्या निर्मितीपासून तो जे धोरण अनुसरीत आला आहे, यापेक्षा अधिक चांगला मार्ग नाही. पूर्व पाकिस्तानातून आसमच्या केवळ एका जिल्ह्यात ( गारो हिल्स ) आलेल्या, ३० हजारांहून जास्त निर्वासितांपैकी ३ हजार ख्रिश्चन आहेत, या गोष्टीचा मला येथे ओझरता उल्लेख करावासा वाटतो. तेव्हा, केवळ हिंदूंनाच नव्हे तर ख्रिश्चन लोकांनाही, पाकिस्तानमध्ये, सुरक्षित वाटत नाही. ख्रिश्चन लोक-सुध्दा, पाकिस्तानात, अल्पसंख्येने आहेत.

## भारत व पाकिस्तान यांच्यातील अल्पसंख्य लोक—दोहोंमधील फरक

आपल्या देशातील अल्पसंख्य जमातीचे उच्चाटन करणे पाकिस्तानला सोपे आणि शक्य आहे. परंतु आम्ही मुसलमानांना अल्पसंख्य जमात मानीत नाही तर आमच्या देशातील एक महत्त्वाचा व अविभाज्य घटक मानतो. आमच्या देशाच्या प्रत्येक खेड्यात व शहरात मिळून, ५ कोटी मुसलमान लोक, आपल्या हिंदू देशबांधवांबरोबर राहात आहेत. हिंदू व मुसलमान यांच्या लोकसंख्येची अदलाबदल करण्याची कल्पना सुध्दा आम्हाला तिरस्करणीय वाटते. भारतात राहात असलेल्या सर्व जमातीच्या लोकांना संरक्षण व पूर्ण हक्क दिले नाहीत तर भारताचे तुकडे पडतील याची आम्हाला जाणीव आहे.

बोलके व निरुत्तर करणारे आकडे पाकिस्तानच्या परराष्ट्रमंत्र्यांना आवडत नाहीत. आपल्या कल्पनाशक्तीवर व आभासांवर विसंबून राहणे ते

पसंत करतात. पूर्व पाकिस्तानातून बेकायदेशीरपणे भारतात आलेल्या लोकाविषयी मी ह्यापूर्वी जे निवेदन केले त्यातील आकडेवार माहितीचा मी उल्लेख करीत नाही. १९५१ ते ६१ या काळात, पूर्व पाकिस्तानात, मुसलमानांची संख्या २६ टक्क्यानी वाढली असताना हिंदूंची संख्या मात्र तेवढीच राहिली व पश्चिम बंगालमधील मुसलमानाची संख्या, स्वाभाविक प्रमाणापेक्षा किती तरी जास्त वाढली ही गोष्ट सूर्यप्रकाशाइतकी स्पष्ट आहे. पाकिस्तानने, ती अमान्य केलेली नाही व तो अमान्य करू शकत नाही. पूर्व पाकिस्तानातील एका सुध्दा मुसलमानाला भारतात जावेसे वाटावे, याचे परराष्ट्रमंत्र्याना आश्चर्य वाटते. पूर्व पाकिस्तानातील मुसलमानांना सुध्दा, बहुधा भारत, हा अधिक चांगला व अधिक शांततामय देश वाटतो. भारतात, आपल्याला लोकशाही व मूलभूत हक्क उपभोगायला मिळतील असे त्याना वाटत आहे. रीतसर विसा मिळवलेले ४० हजार पाकिस्तानी मुसलमान आज भारतात, आपला चरितार्थ चालवत आहेत. शिवाय अल्पमुदतीचा विसा घेउन, सुमारे अडीच लाख पाकिस्तानी मुसलमानांनी १९६३ मध्ये भारताला भेट दिली. मुसलमानांना भारतात असुरक्षित वाटत असते तर पाकिस्तानातील मुसलमान इतक्या मोठ्या संख्येने भारतात आले असते का ? परराष्ट्रमंत्र्यांनी असेही सांगितले की भारताने पासपोर्टविषयक कडक निर्बन्ध बसवल्यामुळे, पाकिस्तानी नागरिकांनी भारतात जाणे अशक्यप्राय आहे. परंतु एक गोष्ट ते विसरतात ती अशी की पूर्व भारत व पूर्व पाकिस्तान यांच्यात, दोन हजार मैलांलाबीची खुली सरहद्द आहे व पासपोर्टचे नियमच काय, पण कितीही कडक पोलीस पहारा ठेवला तरी सरहद्द ओलांडायला लोकाना, प्रतिबंध करता येणार नाही. त्यांनी लंडनच्या 'टाइम्स' पत्रातील मजकूरही उद्धृत केला आहे. तितक्याच महत्वपूर्ण असलेल्या दुसऱ्या एका इंग्रजी नियतकालिकामधील 'एकॉनॉमिस्ट' मधील—मजकूर मी येथे उदधृत करतो. आपण अलीकडेच पाकिस्तानमध्ये गेलो होतो, असा दावा करणाऱ्या एका वातमीदाराने पाठवलेले वातमीपत्र, या नियतकालिकाच्या ५ ऑक्टोबर, १९६३ च्या अंकात प्रसिध्द झाले. यातील मजकूर असा:—

"भारताच्या चीड येईल, असे काही तरी करण्याचा अगदी ताजा प्रकार म्हणजे आसाम-पूर्व पाकिस्तान सरहद्दीवरील पूर्व पाकिस्तानातील लोकांचे स्थलांतर. पूर्व पाकिस्तानातील लोकांनी चोरटेपणाने भारतीय प्रदेशात प्रवेश केला आहे, अशी तक्रार भारत कित्येक दिवसापासून करीत आहे. काही जण सांगतात की १९५१ पासून आलेल्या अशा लोकांची संख्या, ५ लाखापर्यंत आहे. हे स्थलांतर, रावळपिंडीच्या पूर्वसंकल्पित राजकीय डावपेचामुळे घडून आले असे म्हणण्यापेक्षा, पूर्व पाकिस्तानातील हलाखीच्या स्थितीचे ते द्योतक आहे, असे म्हणणे अधिक योग्य ठरेल. स्थलांतर केलेल्या या दुःखीकष्टी लोकांना सरहद्दीवर पुन्हा पोचवण्यात येते, तेव्हा भारत, आसाममधील मुसलमानांची हकालपट्टी करण्याचा प्रयत्न करीत आहे, असे सांगून पाकिस्तान भारताचा निषेध करतो."

पाकिस्तानच्या परराष्ट्रमंत्र्यांनी ज्यांचा लेख उद्धृत केला आहे ते श्री० रिचर्ड क्रिचफील्ड, १ जानेवारी, १९६४ च्या *न्यूयॉर्क हेराल्ड ट्रिब्यूनमध्ये* पाकिस्तानविषयी काय म्हणतात ते पहा :—

"पश्चिम पाकिस्तानला अजूनही राष्ट्रीय उत्पन्नाचा ५१ टक्के भाग मिळतो परंतु, केंद्रीय सरकारातील जवळ जवळ ९० टक्के नोकरवर्ग व सेनादलातील जवळ जवळ सर्व सैनिक, पश्चिम पाकिस्तानातील आहेत.

"पूर्व पाकिस्तानात संपूर्ण पाकिस्तानच्या निम्म्यापेक्षा जास्त लोकसंख्या आहे. परंतु त्याचे क्षेत्रफळ, संपूर्ण पाकिस्तानच्या क्षेत्रफळाच्या १५ टक्के सुध्दा नाही. निर्यात व्यापारामुळे मिळणाऱ्या उत्पन्नाचा ७० टक्के भाग पूर्व पाकिस्तानमुळे मिळतो. परंतु परवा परवा पर्यंत, त्याला खर्च करण्याच्या रकमेचा फक्त एकतृतीयांश भाग व अमेरिकेकडून मिळणाऱ्या मदतीचा एकपंचमांश भाग मिळत असे व विकासासाठी उद्योगपती व व्यापारी यांच्याकडून नव्याने मिळणाऱ्या पैशापैकी जवळ जवळ काहीच मिळत नसे.

"पाकिस्तानच्या निर्मितीची कल्पना, खरोखरच ज्यांना चित्ताकर्षक वाटत नाही ते हे पाकिस्तानी आहेत. प्रौढ मतदान पध्दत पुन्हा सुरु

करणे व वृत्तपत्र, भाषण, व संघटन स्वातंत्र्याचा हक्क देणे, या उपायांमुळे, ही परिस्थिती सुधारता येईल." (पाकिस्तानात या गोष्टी नाहीत.) "अध्यक्ष अयूबखान यांनी, जो भक्कम राजकीय पाया घालणे आवश्यक आहे तो ते, केवळ भारताचा द्वेष करून घालू शकत नाही"

श्री क्रिचफील्ड यांच्या मतानुसार, पाकिस्तानच्या परराष्ट्रीय धोरणाचे एकच अधिष्ठान आहे व ते म्हणजे भारताचा द्वेष करणे. माझ्या अगोदरच्या निवेदनात मी हेच सांगितले होते

पूर्व पाकिस्तानात अशी परिस्थिती असताना, तेथील लोकांनी कामधंद्याची अधिक चांगली संधी मिळवण्यासाठी इतरत्र जावे, यात काय नवल आहे ? पाकिस्तानी लोकांनी बेकायदेशीरपणे व चोरटेपणाने स्थलांतर केल्याने केवळ भारतासमोरच नव्हे तर ब्रह्मदेशासमोरही प्रश्न निर्माण झाला. पूर्व पाकिस्तानला लागून असलेला तोच एक दुसरा देश आहे. ब्रह्मदेशातील वर्तमानपत्रातल्या बातम्यांवरून असे समजते की असे सुमारे अडीच लाख लोक ब्रह्मदेशात शिरले असावेत.

पाकिस्तानातून येणाऱ्या लोकांसबंधीच्या आमच्या धोरणात कोणताही बदल झालेला नाही. परंतु मानवतावादी व भूतदयावादी कारणास्तव, पूर्व पाकिस्तानातून भारतात येऊ इच्छिणाऱ्यांच्या प्रमाणपत्राची तपासणी करण्याचे काम लौकर करून, सर्व सोयी देणे आम्हाला भाग आहे. छळाच्या भीतीने पळून येणाऱ्या निर्वासितांच्या विनतीचा, सर्वच देश, दयाळूपणाने विचार करतात, हे आपल्याला माहीत आहेच. पूर्व पाकिस्तानातील हिंदू अल्पसंख्य जमातीला पश्चिम बंगालमध्ये येण्याच्या अधिक चांगल्या सोयी उपलब्ध केल्या जातील अशी जी घोषणा, आमच्या गृहमंत्र्यांनी केली आहे, तिच्यामुळे जातीय भावना चेतविल्या जातील असे म्हणणे हास्यास्पद आहे. पूर्व पाकिस्तानात दंगे होऊन बरेच लोक ठार होतात, तेढ कायम राहाते, व वर्तमानपत्रे आपला विषारी प्रचार चालूच ठेवतात, अशी स्थिती असताना, अल्पसंख्य हिंदू जमातीच्या, मनात धडकी

भरावी व सुरक्षिततेसाठी तिला भारतात यावेसे वाटावे, हें अगदी स्वाभाविक आहे.

यासंबंधात, भारतातील आसाम सरकारकडून काय माहिती मिळाली आहे तिचा मला येथे उल्लेख करावासा वाटतो. ती एक भयानक कहाणी आहे व नाईलाजाने मला ती मंडळासमोर वाचून दाखवावी लागत आहे. ६ फेब्रुवारी रोजी, एक हजार निर्वासिताची एक तुकडी, पूर्व पाकिस्तानातून आसाममध्ये जात असताना, पूर्व पाकिस्तान रायफल्स, या पाकिस्तान सरकारच्या निमलष्करी दलाने त्यांच्यावर गोळीबार केला. त्यामुळे, ११ निर्वासित जखमी झाले. त्यात काही स्त्रिया होत्या. व दोन मुले ठार झाली. जखमी लोकांना, व मरण पावलेल्यांची प्रेते, निर्वासितांनी आसाममध्ये आणली. आसाम सरकारने पूर्व पाकिस्तान सरकारकडे निषेध व्यक्त केला असून, भारतात आसरा घेऊ इच्छिणाऱ्या निःशस्त्र लोकांवर गोळीबार करण्याचे त्याने थांबवावे, अशी विनंती पाकिस्तानी अधिकाऱ्यांना करण्यात आली.

ज्या मुसलमानांना हाकलून लावण्यात आले आहे ते भारतीय नागरिक आहेत की पाकिस्तानी नागरिक आहेत, हे ठरवण्यासाठी, एखाद्या निःपक्षपाती निवाडामंडळाने चौकशी करावी, या पाकिस्तानच्या परराष्ट्रमंत्र्यांच्या सूचनेचे मला आश्चर्य वाटते. त्यांनी सांगितले आहे की जातीय सलोखा राखणे, हा भारत व पाकिस्तान यांचा अंतर्गत प्रश्न आहे. तर मग एखादी व्यक्ती भारतीय नागरिक आहे की नाही हे ठरवणे, ही काय भारताची अंतर्गत बाब नाही ? अत्यंत आदरपूर्वक मी असे विचारू इच्छितो की सुरक्षितता मंडळाचे सभासद राहण्याचा सन्मान ज्या देशांना लाभला आहे व ज्या देशाचे प्रतिनिधी या टेबलाभोवती बसले आहेत, त्याच्यापैकी एखादा देश तरी, आपण कोणत्या परकीय लोकांना आपल्या देशात येऊ द्यावे किंवा राहण्याची परवानगी द्यावी, किंवा कोण आपल्या देशाचा नागरिक आहे व कोण परका आहे, हे ठरवण्याचा आपला

सार्वभौम हक्क सोडून द्यायला तयार होईल का ? मी अगोदरच सांगितल्याप्रमाणे, आम्ही लोकांना आमच्या लहरीनुसार हाकलून लावीत नाही व भारत सोडून जाण्याची नोटीस बजावण्यात आल्यामुळे आपल्यावर अन्याय झाला आहे, असे ज्या लोकांना वाटते त्याचे म्हणणे आम्ही शांतपणे ऐकून घेतले आहे व घेत आहोत.

पाकिस्तानच्या परराष्ट्र मंत्र्यांनी हिंदू समाजावर व हिंदु धर्मावर अश्लाघ्य टीका केली आहे. या धर्माचे तत्त्वज्ञान किंवा तत्त्वे याची माहिती त्यांना असावी अशी अपेक्षा मी करू शकत नाही. दक्षिण व आग्नेय आशियाई देशाचा दौरा करीत असताना, पाकिस्तानच्या अध्यक्षानी अशीच टीका केली. त्याना सद्भाव निर्माण करायचा होता तो हिंदू धर्मावर हल्ला चढवून. स्वत:च्या धर्माखेरीज अन्य धर्माची योग्यता ओळखण्याकरता, सहिष्णुता व मनाचा मोठेपणा आवश्यक आहे. भारतात अजूनही जातिव्यवस्था आहे, हे खरे आहे. परंतु, जातिभेद- विरहित समाजव्यवस्था निर्माण करणे, हे आमचे ध्येय असून, ते साध्य करण्यासाठी आम्ही सतत कार्य करीत आहोत. गेल्या अनेक शतकांपासून ज्या संस्था चालत आल्या आहेत, त्या बदलणे हे काही सोपे काम नाही. आम्ही अस्पृश्यतेवर बंदी घातली आहे, अस्पृश्यता पाळणे बेकायदेशीर ठरवले आहे व हे खरे असल्याचे पाकिस्तानच्या परराष्ट्र मंत्र्यांनीही मान्य केले आहे. जीवनाच्या कोणत्याही क्षेत्रात, अस्पृश्यता पाळणाऱ्या कोणत्याही व्यक्तीला कायद्यान्वये शिक्षा करण्याची तरतूद आम्ही केली आहे. जातीला मुळीच महत्त्व दिले जात नाही. आणि सामाजिक क्षेत्रात सुध्दा, जातीचा पगडा कमी कमी होत चालला आहे.

पाकिस्तानच्या प्रतिनिधींनी ज्या उपमा आहेत व जी रूपके निवडली, त्याबद्दल मला त्याचा मत्सर वाटत नाही. ती अत्यंत अश्लाघ्य व असभ्य आहेत. त्यांनी भारताची तुलना, आपले खोटे दात दाखवणाऱ्या एका म्हाताऱ्याशी केली आहे. परंपरा व इतिहास याचा विचार करता, भारत पुरातन देश असला तरी स्वातंत्र्यप्राप्तीचा विचार करता,

भारत हा एक तरुण देश आहे. स्वातंत्र्यानंतर त्याने लोकशाही संस्थांची जोपासना केली आहे व आर्थिक विकासाचा कार्यक्रम हाती घेतला आहे. हे काही आमचे खोटे दात नव्हेत. भारत स्वतंत्र देश म्हणून उदयाला आला त्यानंतर आलेले हे दात आहेत.

पाकिस्तानच्या चीनच्या मैत्रीविषयी आम्ही नापसंती व्यक्त करावी, याविषयी पाकिस्तानच्या परराष्ट्रमंत्र्यांनी आश्चर्य व्यक्त केले आहे. आम्ही त्याविषयी नापसंती व्यक्त करीत नाही. सर्व देशांची मैत्री संपादन करण्यावर आमचा विश्वास आहे व चीनने आमच्यावर आक्रमण करण्यापूर्वी तो आमचा सुध्दा मित्र होता. चीनबरोबरचे पाकिस्तानचे संगनमत, या माझ्या शब्दप्रयोगाला परराष्ट्र मंत्र्यांनी आक्षेप घेतला आहे. बहुधा त्यांना चीनशी अधिक चिरस्थायी स्वरुपाचे संबंध स्थापन करायचे असतील. आमचा जर कशाला आक्षेप असेल व जर कशाविषयी आम्ही नापसंती व्यक्त केली असेल तर ती चीनने आमच्यावर आक्रमण करायला सुरुवात केल्यापासून, पाकिस्तानने वेळोवेळी आमच्याबाबत जी भूमिका स्वीकारली तिच्याबद्दल. चीनने जेव्हा आमच्यावर हल्ला केला तेव्हा कोणालाही असे वाटले असते की, "आपली आपसात भांडणे आहेत. व मतभेद आहेत, परंतु आम्ही तुमचे शेजारी आहोत व आम्ही तुमच्यावरील संकटात भर घालणार नाही" असा दिलासा पाकिस्तान आम्हाला देईल, अशी भूमिका हितकारक ठरली असती. परंतु पाकिस्तान आमच्या बाजूने उभा राहिला नाही, इतकेच नव्हे तर मित्र देशांनी आम्हाला मदत करू नये म्हणून त्याने, प्रत्येक युक्तिवादाचा अवलंब केला. आज सुरक्षितता मंडळाबरोबर ज्या डावपेचाचा तो उपयोग करीत आहे, त्याचाच त्याने उपयोग केला व आग्नेय आशिया करार संघटना, व उत्तर अटलांटिक करार संघटना, यांच्या सभासद देशांनी आम्हाला मदत केली तर पाकिस्तान या संघटनातून बाहेर पडेल, अशी धमकी त्याने दिली.

## पाकिस्तान करारात सामील का होतो ?

पाकिस्तानच्या परराष्ट्र मंत्र्यांनी असे म्हटले आहे की पाकिस्तान

आपल्या मित्रांशी नेहमी, एकनिष्ठ राहिला आहे. यासंबंधात, चीनचे पंतप्रधान श्री० चौ० एन्-लाय यांनी १० एप्रिल, १९६३ रोजी असोशिएटेड प्रेस ऑफ पाकिस्तानला जे निवेदन दिले केवळ तेच मी उद्धृत करतो. श्री० चौ एन्-लाय म्हणाले "राजकीय व लष्करी दृष्ट्या भारतावर वरचढ होणे, केवळ याच कारणास्तव, पाकिस्तान पाश्चात्य देशाच्या लष्करी करारात सामील झाला आहे. या करारात सामील होण्याची इतर कोणतीही कारणे नाहीत असे पाकिस्तानच्या पुढाऱ्यांनी मला १९५४ साली निश्चित शब्दात सांगितले." "मला माझ्या मित्रांपासून वाचवा" असे आता पाकिस्तानचे परराष्ट्र मंत्री म्हणतील की काय हे मला माहीत नाही. आमच्यावर संकट ओढवले असताना, आमची संरक्षणव्यवस्था मजबूत करण्याच्या कामी प्रतिबंध करण्याचा पाकिस्तानने पराकाष्ठेचा प्रयत्न केल्यानंतर त्याने चीनच्या बाजूने प्रचार सुरू केला व आजही तो असा प्रचार करीत आहे व आम्ही आक्रमक आहोत व आक्रमण चीनवर करण्यात आले आहे, असे तो सारखा सांगत आहे. आक्रमण केल्याचा आरोप नेहमी निरपराधी पक्षावरच करायचा, हा पाकिस्तानचा ठराविक उपक्रम दिसतो.

आमचे केवळ चीन बरोबरचे नव्हे तर इतर शेजारी देशांबरोबरचे संबंध बिघडलेले आहेत, असे पाकिस्तानच्या परराष्ट्र मंत्र्यांनी म्हटले आहे. पाकिस्तान आमच्या विरुध्द हा जो विषारी प्रचार विनाकारण करीत आहे, याची कारणे व हेतू अगदी स्पष्ट आहेत. सर्व देशांबरोबर, मग त्यांची राजकीय प्रणाली, किंवा त्याची अर्थव्यवस्था किंवा राजकीय व्यवस्था कोणत्याही प्रकारची असो, मैत्रीचे संबंध स्थापन करण्यावर आमचे अलिप्ततेचे धोरण आधारलेले आहे. आमचे शेजारी देश—अफगाणिस्तान, नेपाळ, ब्रह्मदेश, व लंका यांच्या बरोबर आमचे अत्यंत स्नेहपूर्ण संबंध आहेत. चीन बरोबरही आमचे तितकेच मैत्रीचे संबंध होते. परंतु चीनने आमच्यावर हल्ला केला आणि जबरदस्तीने व बेकायदेशीरपणे आमच्या देशाचा एक भाग व्यापला.

## आफ्रिकेने केलेला भारताचा गौरव

आमची दक्षिण आफ्रिकेशी तुलना करण्याइतकी पाकिस्तानची मजल गेली आहे. १९४६ साल मला चांगले आठवते. भारतीय प्रतिनिधी मंडळाचा एक सभासद म्हणून मी संयुक्त राष्ट्र संघटनेच्या अधिवेशनासाठी आलो होतो. व भारताने दक्षिण आफ्रिकेविरुध्द जो ठराव मांडला व संयुक्त राष्ट्र महासभेच्या दोनतृतीयांश बहुमताने तो मंजूर करवून घेण्यात भारताला यश मिळाले त्या ठरावावर मी बोललो होतो. वर्णीय पक्षपात आणि दक्षिण आफ्रिकेचे वर्णीय पक्षपाताचे धोरण याच्या विरुध्द प्रथम आम्ही लढा पुकारला. आमच्या आफ्रिकी बांधवाच्या मनात आमच्याविषयी वितुष्ट निर्माण करायचा पाकिस्तानचा प्रयत्न यशस्वी होणार नाही हे मी सांगू इच्छितो. पाकिस्तानचे सन्माननीय परराष्ट्र मंत्री जे काही म्हणत आहेत, त्यापेक्षा आफ्रिकी लोक जे म्हणतात ते अधिक विश्वासार्ह आहे, असे मला वाटते. उदाहरणार्थ, दक्षिण आफ्रिकेतील श्री० अल्बर्ट लुथुली लेट माय पिपल गो' या आपल्या पुस्तकात काय म्हणतात ते पहा. श्री० लुथुली हे दक्षिण आफ्रिकेतील एक प्रमुख पुढारी असून त्यांना शांततेचे नोबेल पारितोषिक देण्यात आले आहे व त्यानी आपले हे पुस्तक १९६२ मध्ये लिहिले हे मंडळाला माहीत असेलच. आपल्या पुस्तकाच्या २१० व्या पानावर ते म्हणतात, "सयुक्त राष्ट्र संघटनेमध्ये भारताने दक्षिण आफ्रिकेतील गांजलेल्या बहुसख्य लोकाचा जो कैवार घेतला आणि वर्णीय पक्षपाताचे लांच्छनास्पद धोरण ज्या रीतीने चव्हाट्यावर माडले त्यामुळे आम्हाला अपरिमित आनद झाला."

## पाकिस्तानचा दक्षिण आफ्रिकेशी व्यापार

जर साम्य कोणात असेल तर ते पाकिस्तान व दक्षिण अफ्रिका यांच्या धोरणामध्ये आहे. दक्षिण आफ्रिकेचे सरकार, वर्णीय पक्षपाताच्या धोरणाचे उच्चाटन करण्याऐवजी त्याला पाठिंबा देत आहे. ते अनुसरण्यात अभिमान बाळगीत आहे व त्याला कायद्याचे व सरकारी पाठबळ देत आहे.

पाकिस्तानसुध्दा, नाना वंशांचे लोक राहात असलेली बहुरंगी समाजव्यवस्था निर्माण करण्याऐवजी एका जमातीने दुसऱ्या जमातीचा द्वेष करण्याचा प्रचार करीत आहे व आपल्या धोरणाच्या, प्रत्येक अंगात, असहिष्णुता व धर्मांधता व्यक्त करीत आहे. संयुक्त राष्ट्र संघटनेच्या महासभेने, आपल्या सतराव्या अधिवेशनात, जो ठराव मजूर केला (१७६१) त्यात सर्व देशाना, दक्षिण आफ्रिकेबरोबरचा व्यापार बद करण्याची विनती केली होती, याचा मला या ठिकाणी उल्लेख करावासा वाटतो. गेल्या १७ वर्षापासून, भारत, दक्षिण आफ्रिकेशी व्यापार करीत नाही, हे सर्वांना माहीत आहेच. हा ठराव मजूर करण्यात आल्यानतर सुध्दा व त्याचा संयुक्तपणे पुरस्कार करून, ठरावाच्या बाजूने मत देऊन सुध्दा, पाकिस्तानने दक्षि आफ्रिकेबरोबरचा व्यापार चालू ठेवला. २२ नोव्हेंबर, १९६३ च्या संयु राष्ट्र संघटनेच्या कागदपत्रांतील (ए।एसपीसी।९४) मजकूर मी येथे उद्धृ करतो. महासभेच्या १७६१ (१७) क्रमाकाच्या ठरावानुसार, व सुरक्षित मंडळाच्या ७ ऑगस्ट, १९६३ च्या ठरावानुसार मिळालेली सभासद देशांचे उत्तरे, या कागदपत्रात आहेत. सरचिटणीस, किंवा दक्षिण आफ्रिकेच्य वर्णीय पक्षपातासंबंधीच्या धोरणाविषयीच्या खास समितीचे अध्यक्ष यांन पाठवलेल्या पत्रात, किंवा महासभा अथवा सुरक्षितता मंडळ यांच्यासमो केलेल्या निवेदनात ही उत्तरे अंतर्भूत होती. या कागदपत्रातील पाकिस्तान च्या निवेदनातला मजकूर मी येथे देतो:

"पाकिस्तानने, दक्षिण आफ्रिकी मालाची आयात बंद केली असून दक्षिण आफ्रिकेला, शस्त्रास्त्रे, दारुगोळा, व सर्व प्रकारची लष्करी वाह व लष्करीदृष्ट्या महत्त्वाची असलेली सामग्री विकण्यावर, त्याने बंद घातली आहे. अगोदरच केलेल्या कराराप्रमाणे, तो दक्षिण आफ्रिकेबरोब थोडाफार निर्यात व्यापार अजूनही करीत आहे. परंतु तोही बद करण्याच तो विचार करीत आहे. (एएस पीसी।९४ पान २१.)

महासभेने, १७६१ (१७) हा ठराव, १९६२ मध्ये मंजूर केला

पाकिस्तानचे हे जे उत्तर मी उदधृत केले ते २२ नोव्हेंबर, १९६३ मध्ये इतक्या उशीरा देण्यात आले.

पोर्तुगालबरोबर अजूनही राजनैतिक संबंध असलेले जे काही थोडेसे आफ्रिकी-आशियाई देश आहेत, त्याच्यापैकी पाकिस्तान हा एक देश आहे. त्याचे पोर्तुगालशी केवळ राजनैतिक संबंध नव्हे तर व्यापक स्वरूपाचे व्यापारी संबंध व विमानवाहतुकीचे संबंधही आहेत. भारताने मागेच, पोर्तुगालबरोबरचे राजनैतिक संबंध तोडून टाकले. काश्मीरची अंगोला किंवा मोझांबिकशी तुलना करणे, हा केवळ कल्पनाशक्तीचा खेळ नाही तर यावरून विकृत आणि रोगट मनोवृत्ती दिसून येते काश्मीरमधील स्वयनिर्णयाच्या प्रश्नाला अंगोला आणि मोझांबिक किंवा इतर आफ्रीकी प्रदेश यांच्यातील स्वयंनिर्णयाच्या प्रश्नाबरोबर लेखणे हे हास्यास्पद आहे. जम्मू आणि काश्मीर हा भारताचा एक भाग आहे. तर अंगोला आणि मोझांबिक हे अस्वायत्त प्रदेश आहेत. तशी घोषणा १९६० मध्ये मंजूर करण्यात आलेल्या संयुक्त राष्ट्र महासभेच्या १५४२ (१५) या ठरावात केली आहे. संयुक्त राष्ट्रांच्या सनदेनुसार या प्रदेशातील लोकांना, त्यांच्या इच्छेनुसार स्वातंत्र्याचा हक्क आहे.

पाकिस्तानच्या सन्माननीय परराष्ट्र मंत्र्यांनी स्वयनिर्णयाच्या प्रश्नावर पुष्कळच चर्पटपंजरी केली. त्यांनी अनेक शब्द वापरले असले तरी वंश किंवा भाषा यांच्या दृष्टीने, उरलेल्या पाकिस्तानातील लोकांपेक्षा जे लोक भिन्न असल्याचे सर्वांना माहीत आहे,त्या पख्तून, बलुची किंवा पूर्व पाकिस्तानी लोकांना ते स्वयंनिर्णयाचा हक्क द्यायला तयार आहेत काय, या प्रश्नाचे उत्तर त्यांच्याजवळ नाही.

## स्वयंनिर्णयाचे तत्त्व देशाचे तुकडे पाडण्यासाठी नाही

स्वयंनिर्णयाचे तत्त्व राष्ट्रांना लागू आहे व एखाद्या राष्ट्राचे तुकडे पाडण्यासाठी त्याचा उपयोग करता येणार नाही, हे मला पुन्हा सांगायचे

आहे. कटांगाच्या स्वयनिर्णयाला विरोध करण्यासाठी, संयुक्त रा संघटनेने व आफ्रिकी देशानी, याच तत्वाचा आधार घेतला. कांगोचे आफ्रिकेच्या एका मोठ्या भागाचे तुकडे होऊन गोंधळ व अराजकता निर्मा होण्यापासून त्यांना वाचवणाऱ्या या निर्णयाच्या योग्यायोग्यतेसंबंधी कोणीह शंका घेत नाही.

५ फेब्रुवारी रोजी मी जे निवेदन केले, त्यात मी आमची भूमिक स्पष्ट केलेलीच आहे. ती मी पुन्हा एकदा मांडतो स्वयनिर्णयाच्य तत्त्वाला आमचा पूर्ण पाठिंबा आहे आणि मी पुन्हा सांगतो कं स्वयनिर्णयाच्या तत्त्वाला आमचा पूर्ण पाठिंबा आहे परंतु राष्ट्राचे तुक पाडणारे एक साधन म्हणून सयुक्त राष्ट्र सघटनेचा कोणताही सभास देश ते स्वीकारणार नाही.

जागतिक सघटनेचा एक सभासद देश या नात्याने आम्ही स्वयनिर्णयाचा हक्क यापूर्वीच बजावला आहे. जम्मू व काश्मीरचे प्रतिनिधी लोकनियुक्त प्रतिनिधींच्या ज्या घटना समितीमध्ये सामील झाले त्या घटना समितीच्या मार्फत भारतीय जनतेने एका राज्यघटनेचा अंगिकार केला. गेल्या १४ वर्षापासून ही घटना अंमलात आहे. या घटनेप्रमाणे प्रौढ मतदानपद्धतीनुसार तीन सार्वत्रिक, निवडणुका झाल्या. शेवटच्या निवडणुकीतील मतदाराची संख्या २१ कोटी होती. आतापर्यंतच्या इतिहासातील मतदाराची ही सर्वात मोठी सख्या आहे. जम्मू आणि काश्मीरमध्ये राहात असलेले भारतीय लोक या स्वयनिर्णयात पूर्ण सहभागी झाले. स्वयनिर्णयाचा त्याचा हक्क त्यानी यापूर्वीच बजावला आहे. परंतु भारतीय लोकांपासून वेगळ्या अशा काश्मीरी लोकासाठी स्वयनिर्णयाचा हक्क देण्यात यावा, असे जेव्हा सुचवले जाते तेव्हा आम्ही ते मान्य करू शकत नाही. तसेच जम्मू आणि काश्मीरमधील बहुसख्य लोक एका विशिष्ट धर्माचे पालन करतात, यावर आधारलेली इतर कोणतीही सूचना आम्ही मान्य करू शकत नाही.

५ जानेवारी, १९४९ रोजी भारताचे पंतप्रधान जे म्हणाले तेच मी सांगितले आहे व १९६४ साली आज नेमकी तीच भूमिका मी मांडीत आहे. १३ ऑगस्टच्या ठरावाच्या पहिल्या व दुसऱ्या भागातील अटी जोपर्यंत पूर्ण केल्या जात नाहीत, तोपर्यंत, भारत सरकारची स्वीकृती, आमच्यावर बंधनकारक आहे, असे मानता येणार नाही, हे आमच्या पंतप्रधानांनी स्पष्ट केले. पंतप्रधानांनी १९४९ मध्ये जी भूमिका मांडली व आज १९६४ साली मी जी भूमिका मांडली आहे, त्यांच्यात तिळमात्रही फरक नाही.

संयुक्त राष्ट्र मंडळाचे अध्यक्ष डॉ० लोर्झनो यांनी भारताच्या पंतप्रधानांनी मांडलेले मुद्दे मान्य केले. (स्मरणपत्र १, एस-११९६ चे परिच्छेद, दोन व तीन) पाकिस्तानच्या परराष्ट्रमंत्र्यांनी श्री० एन० गोपालस्वामी अय्यंगार यांचेही निवेदन उद्धृत केले आहे. २७ मे, १९४९ रोजी, श्री० अय्यंगार यांनी भारताच्या घटना समितीला काय सांगितले ते पहा.... "महाराजांनी सामीलीकरणाची तयारी दर्शवली व गव्हर्नरजनरलनी तिचा स्वीकार केला. त्यांनी जी तयारी दर्शवली, ती पूर्णपणे विनशर्त होती. सामीलीकरण पूर्ण झाले."

वस्तुस्थिति अगदी स्पष्ट आहे, ती म्हणजे, सामीलीकरणाचा एक भाग किंवा सामीलीकरणाच्या अगोदर किंवा त्यानंतर पूर्ण करायची अट म्हणून नव्हे तर भारताने आपल्याआपण जम्मू व काश्मीरमधील लोकांना असे सांगितले की काश्मीरमधील सर्व आक्रमकांना पिटाळून लावून, तेथे पुन्हा शांतता व सुव्यवस्था स्थापन झाल्यावर लोकांची इच्छा अजमावून घेतली जाईल. सामीलीकरण लोकांच्या इच्छेवर अवलंबून आहे असे त्यावेळी जे म्हटले होते ते या मर्यादित अर्थाने. त्याचा सामीलीकरणाच्या कायदेशीरपणावर परिणाम झाला नाही व होऊ शकत नाही. मी पूर्वी सांगितले होते तेच पुन्हा सांगतो की हे सामीलीकरण निर्विवाद व परिपूर्ण होते. भारतीय स्वातंत्र्य कायद्यात सशर्त सामीलीकरणाची किंवा घटक राज्याला

फुटून बाहेर पडण्याचा हक्क देण्याची तरतूद नाही. हा कायदा पाकिस्तानचे परराष्ट्र मंत्री अमान्य करणार नाहीत, अशी माझी खात्री आहे. या कायद्याप्रमाणे, परिपूर्ण व निर्विवाद सामीलीकरणाखेरीज अन्य कोणते सामिलीकरण शक्य आहे हे ते मला सांगू शकतील काय ? या कायद्यात, दूरान्वयाने सुद्धा अपूर्ण, [तात्पुरत्या किंवा सशर्त सामीलीकरणाची तरतूद करणारे एखादे कलम आहे का ? या कायद्यात, सामीलीकरणासंबंधी जी कलमे आहे त्यात, 'सरळ, व निःसंदिग्ध' या शब्दांखेरीज अन्य कोणते शब्द आहेत काय ?

८ ऑगस्ट, १९६२ रोजी पार्लमेंटमध्ये बोलताना, भारताच्या पंतप्रधानांनी पुन्हा हीच भूमिका मांडली.

"भारतातील सर्व संस्थाने जुलै किंवा ऑगस्ट किंवा त्या वर्षाचा उत्तरार्ध (१९४७) या काळात परराष्ट्र व्यवहार दळणवळण आणि संरक्षण या तीन मूलभूत विषयांच्या बाबतीत भारतात सामील झाली. ती केवळ या तीन विषयांच्या बाबतीत सामील झाली म्हणून एखाद्या संस्थानाचे भारतातील सामीलीकरण ऑगस्टमध्ये किंवा सप्टेंबरमध्ये किंवा १९४७ च्या उत्तरार्धात पूर्ण झाले नाही, असे कुणी म्हणू शकेल काय ? अर्थात नाही. कायदा आणि सत्यस्थिती या दोन्ही दृष्टीने ते परिपूर्ण सामीलीकरण होते म्हणून ऑक्टोबरमधील या विशिष्ट तारखेला जम्मू आणि काश्मीरचे भारतातील सामिलीकरण कायदा आणि सत्यस्थिती या दोन्ही दृष्टीने परिपूर्ण होते यासंबंधी कसलीही शंका असू शकत नाही किंवा त्याला आक्षेप घेता येणार नाही"

आम्ही आमची भूमिका कधीही बदलली नाही. १९४७ पासून या घटकेपर्यंत आमची भूमिका तीच राहिली आहे.

संयुक्त राष्ट्र मंडळाचे जे दोन ठराव आम्ही स्वीकारले ते टाकाऊ ठरले आहेत, असे जे मी म्हणालो ते सुरक्षितता मंडळाविषयी मला अनादर वाटतो म्हणून नव्हे. जागतिक संघटनेच्या संस्थापक देशांपैकी भारत हा एक देश आहे व या संघटनेविषयी विशेषतः सुरक्षितता मंडळा-

विषय आमच्या मनात अत्यंत आदर आहे. परंतु जो ठराव १६ वर्षांपूर्वी मंजूर करण्यात आला व ज्याचे पालन पाकिस्तानने अजूनही केले नाही त्या ठरावाला टाकाऊ म्हणायचे नाही तर मग काय म्हणायचे ? त्या ठरावाच्या मुद्यावरच पाकिस्तानने आपल्या वर्तनाने घाव घातला आहे या अर्थाने तो टाकाऊ आहे. काश्मीरमधील पाकिस्तानच्या उपस्थितीसंबंधी पाकिस्तानने जी खोटी निवेदने केली आहेत, त्यांचा उल्लेख न करण्यात पाकिस्तानच्या परराष्ट्र मंत्र्यांनी फार शहाणपणा दाखवला आहे. पाकिस्तान, भारत आणि सुरक्षितता मंडळ यांच्यामधील करार व्हायच्या अगोदर ज्या घटना घडलेल्या आहेत, त्या मुद्याला सोडून आहेत, असे सूचित करून त्यांना गैरसोयीच्या वाटणाऱ्या व अस्वस्थ करणाऱ्या या घटनांची व सत्यस्थितीची वासलात लावण्याचा, परराष्ट्रमंत्र्यांनी प्रयत्न केला आहे. मी अगोदरच सांगितले आहे व मी पुन्हा सांगतो की, सं० रा० च्या भारत-पाकिस्तान मंडळाचे ठराव सशर्त होते. ते अमलात आणता येण्यासाठी एक अट पूर्ण करणे आवश्यक होते. व ती अट म्हणजे, पाकिस्तानने आपले आक्रमक सैनिक काढून घेणे. पाकिस्तानने या घटकेपर्यंतसुद्धा ही अट पूर्ण केली नाही.

काश्मीरमधील पाकिस्तानची उपस्थिती बेकायदेशीर असून, तिचे स्पष्टीकरण देणे पाकिस्तानला अवघड वाटते.

"एखादा करार स्वीकारण्यापूर्वी जे वाद होते ते करार स्वीकारल्यानंतर उकरून काढता येणार नाहीत. ज्या वादाची निष्पत्ती करार करण्यात झाली तो वाद, एकदा करार झाल्यावर पुन्हा उकरून काढता येणार नाही," असे सांगून, गैरसोयीच्या प्रश्नाची विल्हेवाट लावण्याचा पाकिस्तानच्या परराष्ट्र मंत्र्यांनी प्रयत्न केला आहे.

काही विशिष्ट अटींवर आम्ही तडजोडीची योजना मान्य केली म्हणून, त्या अटी पूर्ण करण्यात आल्या नसताना सुद्धा ती योजना बंधनकारक ठरते, हा युक्तिवाद मोठा चमत्कारिक आहे. तात्पुरत्या योजनांची चर्चा त्या योजना कायमच्या बंधनकारक न मानता करता येत नसली तर मग चमत्कारिक परिस्थिति निर्माण

होईल. अशा परिस्थितीत वाटाघाटी कशा करता येतील ? चर्चा करीत असताना अनेक सूचना केल्या जाऊ शकतात व अनेक गोष्टी करण्याची तयारी दर्शवली जाऊ शकते. या सूचना किंवा या गोष्टी स्वीकारल्या तर त्या बंधनकारक होतात. त्या जर स्वीकारल्या नाहीत तर त्या बारगळतात. एखादी गोष्ट करण्याची जर तयारी दर्शवली आणि ती मान्य करण्यात आली नाही किंवा ती अमलात आणली नाही तर ती कायमची राहू शकत नाही. गत-काळात आम्ही हे स्पष्ट केले आहे, आणि ते आम्ही पुन्हा करतो आहोत.

जम्मू आणि काश्मीरवरील आमचे सार्वभौमत्व आम्ही कधीही सोडून दिले नाही. या सार्वभौमत्वाला अप्रत्यक्षपणेसुद्धा आक्षेप घेणारा कोणताही ठराव आम्ही कधीही मान्य केला नाही. संयुक्त राष्ट्राच्या भारत-पाकिस्तान मंडळाने मंजूर केलेला १३ ऑगस्ट, १९४८ व ५ जानेवारी, १९४९ या दोन ठरावात हीच भूमिका मांडलेली असून तिच्यात कोणताही बदल होणार नाही, अशी काळजी आम्ही घेतली आहे. हे ठराव उभय पक्षांनी मंजूर केलेले आहेत. या ठरावात बदल करायला स्वाभाविकपणे आम्ही तयार नव्हतो. विशेषतः जे बदल करायचे सुचवण्यात आले होते, ते केवळ पाकिस्तानलाच अनुकूल होते म्हणून ते आम्ही मान्य करू शकत नाही. उभय पक्षांचे सारखे सैनिक असावेत, इत्यादि विषयांवर बोलणी करण्याबाबत मंडळाच्या ठरावात काही-ही तरतूद नव्हती.

१३ ऑगस्ट, १९४८ चा ठराव टिकाऊ आहे व खुद्द पाकिस्तानने आपल्या वर्तनानेच त्याच्या मुळावर घाव घातला आहे, हे मी आताच थोड्या वेळापूर्वी सांगितले. या ठरावातील तरतुदींचा पाकिस्तानने धडधडीत भंग केला असून यासंबंधीची काही उदाहरणे मी येथे थोडक्यात देतो.

१. काश्मीरमध्ये पाकिस्तानच्या फौजा अजूनही आहेत.

हे पाकिस्तानने अमान्य केलेले नाही.

२. काश्मीरचा जो भाग पाकिस्तानने व्यापला आहे, त्यात आणखी लष्करी सामुग्री आणण्यात आली आहे.

ही गोष्टही पाकिस्तान अमान्य करू शकत नाही.

३. व्यापलेल्या भागात विमान तळ बांधणे, व अशा रीतीने, भारतावर हल्ला करण्याचे तळ स्थापन करून त्याच्या सुरक्षिततेला धोका निर्माण करणे.

हे मुद्दा निर्विवाद सत्य आहे.

४. काश्मीरचा जो भाग पाकिस्तानने व्यापला आहे, तेथील आपले स्थान, बळकट करून तो पाकिस्तानात अंतर्भूत करणे.

हे खोटे आहे, असे सिद्ध करता येणार नाही.

५. लष्करी करारांच्या आपल्या सभासदत्वाचा काश्मीरमधील आपले लष्करी सामर्थ्य वाढवण्यासाठी पाकिस्तानने उपयोग करणे, व तथाकथित 'आझाद फौजा' मजबूत करणे. या फौजात पाकिस्तानचे अधिकारी आहेत व ते त्याना शिक्षण व लष्करी सामग्री देत आहेत.

ही गोष्ट सुद्धा खोटी असल्याचे सिद्ध करता येणार नाही.

६. उत्तरेकडील भाग व्यापणे.

हे भाग पाकिस्तानने व्यापले आहेत.

७. लष्करी सामर्थ्याचा उपयोग करण्याच्या सतत धमक्या देणे व युद्धाचे वातावरण निर्माण करणे.

यामुळे शस्त्रसंधी रेषा पाळण्याच्या बाबतीत सतत उपद्रव होतो आहे.

आजच सकाळी मला दिल्लीहून एक तार मिळाली. या तारेत म्हटले आहे की पाकिस्तानच्या परराष्ट्र मंत्र्यानी ज्या निवेदनाचा आधार घेतला आहे, ते धडधडीत बनावट आहे व हा बनवाबनवीचा प्रकार आहे, असे नवी दिल्ली मधील सरकारी गोटाना व खुद्द बक्षी गुलाम महमद यांना वाटते. मला खरोखरच असे वाटते की जेव्हा एखादी व्यक्ती कोणत्याही निवेदनांचा आधार घेते व त्याचा सुरक्षितता मडळाच्या बैठकीत उपयोग करते, तेव्हा, ती निवेदने खरी आहेत की नाही हे पाहण्याची काळजी घेण्यात आली पाहिजे. पाकिस्तानच्या परराष्ट्र मन्त्र्यानी खोट्या निवेदनाचा आधार घेतला व हे शुद्ध बनावट निवेदन आहे, अशा आशयाची तार व त्यानी उद्धृत केलेल्या निवेदनाचा इन्कार करणारे खुद्द बक्षी गुलाम महमद याचे निवेदन, मला आजच मिळाले आहे.

आणखी एक किरकोळ मुद्दा आहे. परंतु त्याचाही खुलासा मला करायला हवा. ब्रिटन, पाकिस्तान व भारत यांच्यापुरताच विचार करायचा तर भारत व पाकिस्तान हे ब्रिटनचे उत्तराधिकारी आहेत, हे खरे असेल. परंतु आतरराष्ट्रीय दृष्टीने, पाकिस्तान हा एक नवा देश अस्तित्वात आला, व भारत हाच अविभाज्य भारताचा उत्तराधिकारी होता, यात मुळीच शका नाही. हे जर खरे नसेल तर मग संयुक्त राष्ट्र संघटनेचा सभासद म्हणून पाकिस्तानला दाखल करून घेण्याची काही आवश्यकता नव्हती. भारत व पाकिस्तान हे दोन्ही देश जर उत्तराधिकारी असते तर दोन्ही देश, जागतिक सघटनेचे आपोआप सभासद झाले असते. पाकिस्तानच्या परराष्ट्र मन्त्र्यांनी, मध्यस्थीचा व लवादाचाही उल्लेख केला आहे. सार्वभौमत्वाच्या बाबतीत मध्यस्थीचा किंवा लवादाचा प्रश्न मुळीच उपस्थित होत नाही, हे काय मी त्यांना सांगायला हवे ? जो देश आपला सार्वभौम हक्क असल्याचा दावा करतो तो त्यासंबंधी इतर कोणी तरी निवाडा देण्याचे किंवा, तो सार्वभौम आहे की नाही हे इतर कोणत्या तरी देशाला ठरवू देण्याचे कधीही कबूल करणार नाही. सार्वभौमत्वाचे हेच स्पष्ट लक्षण आहे.

भारताच्या फौजा, काश्मीरमध्ये आहेत, असे आम्हाला सांगण्यात आले आहे. गुप्त लष्करी माहिती सांगण्यासाठी मी येथे आलो नाही. इतर कोणत्याही सार्वभौम देशाप्रमाणेच, आमचे सैन्य, आमच्या देशाच्या सरहद्दीच्या आत कोठेही असो, ते आमच्या देशाच्या व लोकांच्या संरक्षणासाठी ठेवलेले आहे. हे सैन्य काश्मीरमधील लोकांचेच सैन्य असून, त्यांना त्याच्यापासून भीती वाटायचे काही कारण नाही. एकीकडे काश्मीरवर पाकिस्तानने आक्रमण केल्यामुळे व दुसरीकडे चीनने आक्रमण केल्यामुळे, आमचे रक्षण करण्यासाठी, पुरेसे उपाय योजणे आम्हाला भाग आहे. श्री० जॉन स्ट्रॅची यांनी आमच्या कृतीबद्दल नेमके हेच मत व्यक्त केले आहे. 'ऑबझर्व्हर'ला पाठवलेल्या त्यांच्या पत्रातील मजकूर मी माझ्या अगोदरच्या निवेदनात उद्धृत केला आहेच.

कलकत्त्यामधील दंग्यांच्या प्रश्नाचे चर्वितचर्वण करण्याची माझी इच्छा नाही मी यासंबंधी अगोदरच बोललो आहे. गरीब मुसलमानांची मालमत्ता जाळून टाकून, जमीन-मालकांना, फायदा उठवू दिला हे धडधडीत असत्य आहे. पश्चिम बंगालचे मुख्यमंत्री व आमचे गृहमंत्री या दोघांनीही हे स्पष्ट केले आहे की, आमच्या मुसलमान बांधवांवरील आपत्तीचा व त्यांच्या हालअपेष्टांचा गैरफायदा घेऊन कोणालाही स्वार्थ साधू दिला जाणार नाही. गृहमंत्र्यांनी त्याच्याही पुढे जाऊन असे सांगितले की जरूर पडल्यास घटनेत सुध्दा बदल केला जाईल. परिस्थितीचा बंदोबस्त करण्यासाठी, पश्चिम बंगाल सरकारने यापूर्वीच वटहुकूम जारी केला आहे.

## सारांश

थोडक्यात सांगायचे म्हणजे, आमच्यावर दोन आरोप करण्यासाठी पाकिस्तान सुरक्षितता मंडळाकडे आला आहे. १. आम्ही काश्मीर भारतात आणखी विलीन करण्याचा प्रयत्न करीत आहोत, व २.